

मराठी

# बालभारती

इयत्ता पाचवी

दुसरी माला









शिक्षणखात्याचा मंजुरी-क्रमांक: पापुमं-३२८४ / बा.भा.म.-८ स दिनांक २-४-१९८४.







**महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ**

**पुणे**

प्रथमावृत्ती: १९८४
पुनर्मुद्रण: १९९१

प्रकाशक: वसंत पाटील
नियंत्रक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
मुंबई-400 018.

कागद: ६१ X ८६ सेमी. ६० जी. एस. एम. क्रीम वोव्ह.
या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षणखात्याने सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला आहे.

टाईप व फोटोसेटिंग: १६ पॉ. साधा. मे. शार्फोटाईप, १५ डॉ. व्ही. बी. गांधी मार्ग, फोर्ट, मुंबई-400 023.

मुद्रक: न्यू राधारमण प्रिंटींग प्रेस, २० वडाळा उद्योग भवन, मुंबई - ३१

मुद्रणादेश क्र: N/Ptg/T.B./5720 (1.00)

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

# प्रस्तावना

'बालभारती' च्या नव्या वाचनमालेतील हे इयत्ता पाचवीचे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद होत आहे.

पाचवीचे हे पुस्तक इयत्ता चौथीच्या 'बालभारती' शी मिळते-जुळते व्हावे असा एक विशेष प्रयत्न यात केला आहे. हे पुस्तक शक्यतो निर्दोष व्हावे या हेतूने या पुस्तकाच्या चाचणी प्रती अनुभवी शिक्षक, शिक्षणतज्ज्ञ, प्रशिक्षण संस्था इत्यादींच्याकडे पाठवून त्यांचे अभिप्राय घेण्यात आले. त्यांनी केलेल्या सूचनांच्या संदर्भात मंडळाच्या मराठी-भाषा-समितीने आवश्यक ते संस्कार करून हे पुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. आस्थापूर्वक घेतलेल्या परिश्रमांबद्दल मंडळ समितीचे आभारी आहे. तसेच अगत्याने अभिप्राय पाठवून ज्यांनी ज्यांनी या पुस्तकाच्या संपादनास हातभार लावला, त्यांचेही मंडळ आभारी आहे.

या पुस्तकाचे अध्ययन-अध्यापन प्रभावी होण्याच्या दृष्टीने या पुस्तकाची शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका उपलब्ध करून देण्याची योजना विचाराधीन आहे. मंडळाच्या या नव्या उपक्रमाचे शिक्षकमित्र स्वागत करतील अशी अपेक्षा आहे.

पुणे:
दि. १ मे १९८४
वैशाख ११, १९०६

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

'मराठी बालभारती इयत्ता पाचवी' या पुस्तकाची 'शिक्षकांसाठी हस्तपुस्तिका' उपलब्ध आहे.

# अनुक्रमणिका


| क्र. | पाठाचे/कवितेचे नाव | लेखक/कवी | पृष्ठ क्र. |
|---|---|---|---|
| १. | पहिला धडा | जयप्रकाश नारायण | १ |
| २. | ओले हिरवे दिवस (कविता) | वा. रा. कांत | ७ |
| ३. | माझा हिरवा मित्र | अनंत काणेकर | ९ |
| ४. | बीज पेरलं गेलं | चंदू बोर्डे | १४ |
| ५. | आजीनं पाहिलेला चोर | व्यंकटेश माडगूळकर | १८ |
| ६. | खोप्यामधी खोपा (कविता) | बहिणाबाई चौधरी | २५ |
| ७. | चिमण्या आणि मुलं | शिरीष पै | २७ |
| ८. | दगड शोधू या | दि. के. बेडेकर | ३२ |
| ९. | वासरू (कविता) | अनिल | ३७ |
| १०. | निसर्ग माझा सोबती | प्र. के. अत्रे | ३९ |
| ११. | कल्पकतेचे वरदान | पद्मजा फाटक | ४३ |
| १२. | भाऊराया (कविता) | — | ४७ |
| १३. | श्यामची आई | सानेगुरुजी | ४९ |
| १४. | प्राणिस्वातंत्र्याचा विजय असो! | सुधाकर प्रभू | ५५ |
| १५. | निर्झरास (कविता) | बालकवी | ६३ |
| १६. | नाना शंकरशेट – मुंबईचे एक शिल्पकार | य. दि. फडके | ६७ |

| | | | |
|---|---|---|---|
| १७. | आम्ही हवे आहोत का? | शांता ज. शेळके | ७३ |
| १८. | सैनिकी रक्त | लक्ष्मीकांत तांबोळी | ७९ |
| १९. | थवे (कविता) | बा. भ. बोरकर | ८३ |
| २०. | एक ऐतिहासिक क्षण | तेनसिंग नोर्गे | ८६ |
| २१. | तुरुंगातील दिवस | शिरुभाऊ लिमये | ९२ |
| २२. | ही भूमी असे कैकांची (कविता) | अण्णा भाऊ साठे | ९६ |
| २३. | निसर्गातील रंगपंचमी | प्रकाश गोळे | ९९ |
| २४. | प्रकाशपूजक डॉ. सी. व्ही. रामन | राम ताकवले | १०४ |
| २५. | लावणी गिरणीची (कविता) | नारायण सुर्वे | १०८ |
| २६. | मायेचा पाझर | यदुनाथ थत्ते | ११० |
| २७. | अन्योक्ती (कविता) | कृष्णशास्त्री चिपळूणकर | ११५ |
| २८. | गाडगेबाबा | गो. नी. दांडेकर | ११७ |
| २९. | दिला शब्द मोडू नये (संगीतिका) | ग. दि. माडगूळकर | १२२ |
| ३०. | छंद हेच जीवन | यास्मिन शेख | १३२ |
| ३१. | संतवाणी (कविता) | जनाबाई, तुकाराम | १३७ |
| ३२. | विचारधन | | |
| | (१) आपण खत होऊ या | नामदार गोपाळ कृष्ण गोखले | १३९ |
| | (२) राष्ट्राचे भावी आधारस्तंभ | महर्षी धोंडो केशव कर्वे | १४० |
| | (३) जाती-पोटजाती अराष्ट्रीय आहेत | डॉ. बाबासाहेब आंबेडकर | १४१ |





# पहिला धडा

**जयप्रकाश नारायण**

**************************************************************

**जयप्रकाश नारायण** (जन्मः १९०२; मृत्यूः १९७९)—थोर देशभक्त, भारतीय समाजवादी चळवळीचे प्रवर्तक आणि भूदान व ग्रामदान चळवळींचे निष्ठावंत नेते. विद्यार्थिदशेतच जयप्रकाशजींनी देशाच्या स्वातंत्र्यलढ्यात स्वतःला झोकून दिले आणि भूमिगत होऊन बेचाळीसचे आंदोलन पेटते ठेवण्यात पुढाकार घेतला. लोक त्यांना प्रेमाने 'लोकनायक जयप्रकाश' किंवा 'जेपी' म्हणत.

मोठी माणसे आपोआप निर्माण होत नाहीत. बालपणापासूनच जे अनुभव त्यांना येतात, त्यांतून त्यांच्या पुढील कार्याचा पाया घातला जातो. देशप्रेम, स्वावलंबन, स्वाभिमान या गुणांचे बीज जयप्रकाशजींच्या मनात बालपणीच रुजले. आपल्या विद्यार्थिदशेतल्या अशा काही आठवणी त्यांनी इथे सांगितल्या आहेत.

माझा जन्म १९०२ साली विजयादशमीला झाला. मी लहानपणी फार गंभीर होतो असं कुणी सांगतात, तर माझी बुद्धी मंद होती असं काहीजण म्हणतात.

मग आली शाळा. शाळा मला आवडायची. अभ्यास करायलाही आवडायचं. नवं नवं किती शिकू असं होऊन जायचं!

वडील सरकारी नोकरीत. वरचेवर बदल्या व्हायच्या. त्यामुळं आमच्या शिक्षणात खंड पडेल असं वडलांना वाटलं. चौथी पास झाल्यावर शिक्षणासाठी मला पाटण्याला ठेवायचं ठरलं. तिथली 'सरस्वती-भवन' ही त्या काळची प्रसिद्ध शिक्षणसंस्था. त्या संस्थेच्या वसतिगृहात मला ठेवण्यात आलं.

ही संस्था मोठी चांगली होती. शिक्षणाच्या अनेक सोई तिथं होत्या. वसतिगृहामुळं नवे नवे मित्र मिळाले. अभ्यासाच्या विषयांशिवाय इतरही अनेक गोष्टींकडं तिथं लक्ष दिलं जाई. संस्थेचं वाचनालयही उत्तम होतं. शाळेच्या पुस्तकांशिवाय इतर कितीतरी विषय त्यामुळं मला कळले.

पुढं मी हायस्कूलमध्ये गेलो. एक इंग्रज गृहस्थ तिथं मुख्याध्यापक होते. ते शिस्तीचे मोठे भोक्ते व स्वभावानं करडे होते. स्वच्छता, नीटनेटकेपणा, टापटीप यांवर त्यांचा कटाक्ष असे. शिकवायचेही चांगलं; पण भारतीयांबद्दल ते नेहमी तुच्छतेनं बोलत.

आमच्या एका सणाच्याच दिवशी त्यांनी परीक्षा ठेवली. कदाचित हे सगळं नकळतही झालं असेल. आम्हांला मात्र वाटलं, त्यांनी हे मुद्दामच तसं केलं असावं.

आम्ही पाच-सहा मित्र जमा झालो. आपल्या स्वाभिमानावर हा आघात आहे याबद्दल आमचं एकमत झालं. याविरुद्ध काहीतरी केलं पाहिजे असं आम्ही ठरवलं. आम्ही सहाहीजण त्या दिवशी परीक्षेला गैरहजर राहिलो.

दुसऱ्या दिवशी शाळेत जाताच आम्हांला मुख्याध्यापकांचं बोलावणं आलं; पण आम्ही मुळीच घाबरलो नाही. छाती पुढं काढून, ताठ मानेनं त्यांच्यापुढं गेलो. त्यांनी विचारलं, "तुम्ही काल परीक्षेला का बसला नव्हता?"

"काल आमचा एक मोठा सण होता."

"अस्सं!"

"अशा सणाला सुट्टी देतात. त्यामुळं आम्ही नाही बसलो परीक्षेला."

"मग तुम्हांला वेताच्या छड्याच दिल्या पाहिजेत तर!" मुख्याध्यापक असं म्हणाल्यावर मी बोललो, "पण स्वाभिमान दाखवणं का वाईट? त्याबद्दल शिक्षा?"

"अरे व्वा!" असं म्हणून त्यांनी हातात छडी घेतली.

आम्ही सगळ्यांनी त्यांच्यापुढं हात केले.

मग मात्र त्यांचं हृदय कळवळलं. ते थोडं थांबले आणि शिक्षा न करताच त्यांनी आम्हांला सोडून दिलं. आम्हा सर्वांनाच फार आश्चर्य वाटलं. त्यांच्या या कनवाळूपणाची फार मोठी छाप माझ्या मनावर पडली. आपण चांगला अभ्यास केला पाहिजे, अशी मनानं उचल खाल्ली.

मी स्वतःची दिनचर्या आखली. पहाटे उठून गार पाण्यानं स्नान करू लागलो. उन्हाळा, पावसाळा, हिवाळा काही असो, यात कधी खंड पडला नाही.

शालान्त परीक्षेला बसलो. चांगल्या गुणांनी पास झालो. महाविद्यालयात प्रवेश केला. विज्ञानाकडं माझा ओढा होता. शिष्यवृत्ती मिळू लागली. शिक्षकांची मर्जी बसली. ते उत्तेजन देऊ लागले. त्यामुळं शिकण्याचा हुरूप अधिक वाढला.

याच वेळी देशात राष्ट्राभिमान वाढवणारं वारं वाहू लागलं. स्वदेशीची चळवळ फोफावली. इंग्रजांनी जालियनवाला बागेत भारतीयांची अमानुष कत्तल केली. हे पाहून माझं मन संतापानं पेटून उठलं. या जुलमी सरकारशी कसलंही सहकार्य करायचं नाही असा मी निर्धार केला.

सरकारमान्य महाविद्यालय सोडून द्यायचं माझ्या मनात येऊ लागलं. मी कॉलेजवर बहिष्कार घालायचं ठरवलं; पण ते सोपं नव्हतं. कारण त्यामुळं माझं शिक्षणच थांबणार होतं. मी पेचात पडलो. शेवटी व्यक्तिगत महत्त्वाकांक्षेपेक्षा देशाचं स्वातंत्र्य आणि स्वाभिमान यांचा विजय झाला.

मौलाना आझादांच्या एका तेजस्वी भाषणामुळं अखेर मी निर्णय घेतला. सरकारी महाविद्यालयाला मी रामराम ठोकला.

गांधीजींच्या साबरमती आश्रमात जावं असं मनात होतं. तेवढ्यात बिहारचं राष्ट्रीय विद्यापीठ स्थापन झालं. त्या विद्यापीठाच्या परीक्षेला बसून मी पहिल्या वर्गात उत्तीर्ण झालो.



विज्ञानाचा अधिक अभ्यास करावा असं वाटत होतं; पण राष्ट्रीय विद्यापीठात त्याची सोय नव्हती. ती सरकारमान्य विद्यापीठात होती; पण तिथं जायचं नव्हतं.

याच वेळी बनारस हिंदू विश्वविद्यालयातला माझा एक मित्र अमेरिकेला जायला निघाला होता. तिथं काम करून स्वावलंबनानं शिकता येतं असं त्याच्याकडून कळलं. मनात आलं, आपणही गेलो तर....? तिथं काम करू, कष्ट करू आणि विज्ञानाचं शिक्षण घेऊ. बस्स! ठरलं. हाच विचार पक्का केला.

प्रवासखर्चाची जेमतेम बेगमी करून जपानमार्गे मी अमेरिकेला रवाना झालो. विश्वविद्यालय सुरू व्हायला थोडा अवधी होता. तोवर शिक्षणासाठी चार पैसे मिळवावे असा विचार केला.

जवळच्याच एका मळ्यात काम मिळतं, असं ऐकलं. तिकडं गेलो. तिथं पुष्कळ भारतीय कामावर होते. त्यांच्यात सामील झालो.

श्रम करून स्वावलंबनानं शिक्षण घ्यायचा माझा निश्चय होता. केल्या श्रमाचा आनंद मिळत होता. श्रम करता करता विचारांना चालनाही मिळत होती. कोणतंच काम तुच्छ नसतं, हा गांधी[illegible]ा स्वावलंबनाचा पहिला धडा मी गिरवू लागलो.

शब्दार्थ व टिपा :

**करडे**—स्वभावाने कडक. **कटाक्ष**—विशेष भर. **आघात**—तडाखा. **दिनचर्या**—रोजचा कार्यक्रम. **ओढा**—आकर्षण; कल. **अमानुष**—अत्यंत क्रूर. **बेगमी**—तरतूद; साठा.

**खंड पडणे**—एखादी चालू असलेली गोष्ट मध्येच बंद पडणे. **छाप पडणे**—मनावर खोल परिणाम होणे. **उचल खाणे**—एखादी गोष्ट करण्याची अनिवार इच्छा होणे. **वारे वाहू लागणे**—एखादा विचार किंवा कल्पना समाजात पसरू लागणे. **बहिष्कार घालणे**—सर्व संबंध तोडून टाकणे. **रामराम ठोकणे**—सोडून देणे, त्याग करणे.

**स्वदेशीची चळवळ**—आपल्या देशात तयार होणाऱ्या मालाला उत्तेजन देण्यासाठी परदेशी वस्तू विकत न घेण्याबद्दलची मोहीम.

**जालियनवाला बाग**—पंजाबमधील अमृतसर येथील एक बंदिस्त मैदान. त्याच्या चारी बाजूंना उंच इमारती असून त्यात जाण्यास एक चिंचोळा मार्ग आहे. महात्मा गांधींच्या सत्याग्रहास पाठिंबा देण्यासाठी १३ एप्रिल १९१९ या दिवशी या मैदानावर एक सभा भरली होती. सुमारे वीस हजार लोक जमले होते. सभेचे काम शांतपणे चालू असताना अकस्मात ब्रिटिश अधिकारी व सैनिक तिथे आले आणि त्यांनी त्या सभेवर अमानुष गोळीबार केला. त्यात अनेक लोक ठार व कित्येक जखमी झाले.

**मौलाना आझाद**—भारताचे एक प्रमुख राष्ट्रीय नेते. स्वतंत्र भारताचे पहिले शिक्षणमंत्री.

**साबरमती आश्रम**—साबरमती नदीच्या काठावर असलेला महात्मा गांधींचा अहमदाबादमधील सुप्रसिद्ध आश्रम.

प्रश्न व स्वाध्याय :

१. जयप्रकाशजींना शिक्षणासाठी पाटण्याला का ठेवण्यात आले?
२. जयप्रकाशजींनी परीक्षेला न बसण्याचा निर्णय का घेतला?
३. मुख्याध्यापकांच्या कनवाळूपणाची साक्ष विद्यार्थ्यांना कोणत्या प्रसंगामुळे पटली? त्याचा काय परिणाम झाला?
४. जालियनवाला बागेतील कत्तलीमुळे जयप्रकाशजींनी कोणता निर्णय घेतला?
५. मौलाना आझादांच्या एका भाषणामुळे जयप्रकाशजींच्या मनावर कोणता परिणाम झाला?
६. जयप्रकाशजींना परदेशी जाण्याचा मार्ग कसा सुचला?
७. 'स्वावलंबनाचा पहिला धडा मी गिरवू लागलो,' असे जयप्रकाशजी का म्हणतात?
८. या पाठाच्या आधारे जयप्रकाशजींच्या अंगी कोणते गुण होते ते सांगा.
९. 'रामराम ठोकणे', 'बहिष्कार घालणे' यांशिवाय आणखी कोणते वाक्प्रचार या पाठात आले आहेत, ते शोधा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
१०. जयप्रकाशजींची अनेक चरित्रे प्रसिद्ध आहेत. त्यांपैकी एखादे चरित्र मिळवून ते वाचा.

***

# २ ओले हिरवे दिवस

**वा. रा. कांत**

**************************************************

**वामन रामचंद्र कांत** (जन्मः १९१३) — 'वाजली विजेची टाळी', 'वेलांटी', 'दोनुली' हे व इतरही यांचे कवितासंग्रह आहेत.

पुढील कविता त्यांच्या 'वेलांटी' या संग्रहातून घेतली आहे. श्रावण महिना आपणा सर्वांना आवडतो. श्रावण महिन्यातील निसर्गाचे सुंदर वर्णन कवीने या कवितेत केले आहे.

गिरिशिखरांवरुनी
सोगे सुटले ढगांचे
ओले हिरवे दिवस
येती, जाती श्रावणाचे

मिटे फुले डोंगरांत
फूल ऊन-सावल्यांचे
स्वप्न दिवसाच्या डोळां
तरळते चांदण्याचे

ओल्याचिंब अवकाशी
आर्त नाद पावशाचा
पान, फूल होऊ पाहे
कण कण मृत्तिकेचा



विष्णुकांतीच्या फुलांच्या
पसरल्या निळ्या राशी
सहस्राक्ष आंथरितो
नेत्र धरेच्या पायांशी

गवताच्या पात्यापरी
भिजलेले माझे मन
इंद्रधनुष्याशी नाते
जोडी तन्मय होऊन.

शब्दार्थ व टिपा :

**सोगा**—नेसलेल्या धोतराचा पुढे सोडलेला लोंबता भाग. **अवकाश**—आकाशाची पोकळी. **आर्त नाद**—दुःखी, खिन्न, व्याकूळ आवाज. **मृत्तिका**—माती. **धरा**—पृथ्वी.

**पावशा**—चातक पक्षी. हा फक्त पावसाचे पडणारे थेंब पिऊन आपली तहान भागवतो व त्यासाठी पावसाची उत्कंठेने वाट पाहत असतो,असा याचा लौकिक आहे.

**विष्णुकांती**—विष्णू या देवाचा रंग निळसर आहे असे मानले जाते. 'विष्णुकांती' या फुलांच्या रंगांतही निळा रंग उठून दिसत असल्याने त्यांना 'विष्णुकांती' हे नाव पडले आहे.

**सहस्राक्ष**—हजार डोळे असलेला—इंद्रदेव.

**स्वप्न दिवसाच्या डोळां, तरळते चांदण्याचे**—श्रावण महिन्यात ढगांमुळे ऊन प्रखर नसते, जणू चांदण्यासारखे ते सौम्य जाणवते. यावरून कवीने अशी कल्पना केली आहे, की दिवस जणू आपल्या डोळ्यांनी चांदण्याचे सुंदर स्वप्नच पाहतो.

प्रश्न व स्वाध्याय :

१. श्रावणातील दिवसांना 'ओले हिरवे दिवस' असे का म्हटले आहे?
२. 'मिटे, फुले डोंगरांत फूल ऊन-सावल्यांचे' यातील कल्पना स्पष्ट करा.
३. मातीचा कण अन् कण काय होऊ पाहतो?
४. विष्णुकांतीची फुले पाहून कवीने कोणती कल्पना केली आहे?
५. आपले मन इंद्रधनुष्याशी नाते जोडते असे म्हणण्यात कवीने काय सूचित केले आहे?
६. (अ) 'ओलेचिंब' म्हणजे खूप भिजलेले. तसेच 'हिरवाकंच' म्हणजे गर्द हिरवा. असेच आणखी काही शब्द सांगा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
(आ) नेत्र, धरा, नाद, गिरी, ढग, फूल, पान या शब्दांना समानार्थी शब्द सांगा.
७. या कवितेत अनेक सुंदर निसर्गदृश्यांचे वर्णन आले आहे. त्यांतील तुम्हांला आवडलेले निसर्गचित्र काढा व ते रंगवा.

***




# माझा हिरवा मित्र

## अनंत काणेकर

**************************************************************

**अनंत आत्माराम काणेकर** (जन्म: १९०५; मृत्यू: १९८०)—लघुनिबंध, प्रवासवर्णन, कविता असे विविध प्रकारचे लेखन यांनी केले आहे. 'पिकली पाने', 'उघड्या खिडक्या' इत्यादी त्यांचे लघुनिबंधसंग्रह. 'धुक्यातून लाल ताऱ्याकडे', 'तांबडी माती निळे डोंगर', 'खडक कोरतात आकाश' ही त्यांची प्रवासवर्णने. 'चांदरात व इतर कविता' हा त्यांचा कवितासंग्रह.

हा उतारा 'पांढरी शिडे' या लघुनिबंधसंग्रहातून घेतला आहे. आपल्याला पशुपक्षी आवडतात. कधी कधी तर त्यांच्याशी आपली दोस्तीसुद्‌धा जमते. आपल्या बालवयात भेटलेल्या अशाच एका पक्षिमित्राचे शब्दचित्र लेखकाने किती जिव्हाळ्याने रेखाटले आहे ते पाहा.

..............................................................

घरात पाळलेले पशू किंवा पक्षी काही दिवसांनी घरातल्या माणसांसारखेच होतात. ती माणसं नाहीत हे आपण जवळजवळ विसरून जातो. फार काय, माणसांपेक्षाही ते आपल्याला अधिक जवळचे वाटतात. माणसातली माणुसकी त्यांच्यात भरपूर असते आणि माणसांतले हेवेदावे, दुष्टावे, आप्पलपोटेपणा मात्र त्यांच्यात मुळीच नसतो.

पोपट म्हटलं, की निर्मळ आठवणींनी आणि कृतज्ञतेनं माझं अंतःकरण भरून येतं. मी अगदी लहान असताना एक पोपटच माझा खेळगडी होता. सदा आनंदी आणि कधीही तक्रार न करणारा. आम्हा दोघांमध्ये वडिलकीचा मान त्याचा होता आणि पुष्कळ वेळा तो आपली वडिलकी माझ्यावर गाजवतही असे.

माझ्या जन्माच्या आधी दोन वर्षं तो पोपट माझ्या वडलांनी आणला होता. संध्याकाळी कामावरून परत येत असता कुठंतरी झाडाखाली पोपटाचं इवलंसं पिलू त्यांना सापडलं. त्यांनी ते उचलून घरी आणलं. माझ्या आईनं त्या



पिलाची अतिशय काळजी घेऊन त्याला वाढवलं. पिलाला काही खाता येत नव्हतं. दुधात कापूस बुडवून त्याच्या चोचीत दिवसातून पाचसहा वेळा आपण काही थेंब पिळत असू, असं आई सांगते. पुढं ते पिलू चांगलं गुबगुबीत होऊन इकडून तिकडं बागडू लागलं. कुणीतरी आईला सांगितलं, अक्कलकाढ्याची मुळी उगाळून जर काही दिवस या पिलाच्या जिभेवर बोटानं घासली, तर त्याची जीभ पातळ होईल आणि हा पोपट फक्कड बोलू लागेल. आईनं कित्येक दिवस तसं केलं.

माझ्या जन्मानंतर दोन वर्षांनी माझे वडील वारले. हा पोपट आणि मी आईबरोबर माझ्या मामांच्या घरी राहायला गेलो. तिथंच आम्ही दोघं लहानाचे मोठे झालो. मी पंधरासोळा वर्षांचा होईपर्यंत हा पोपट जिवंत होता.

इतरांच्या तोंडांतले शब्द कुणी निर्बुद्धपणं पुनःपुन्हा उच्चारू लागला म्हणजे लोक त्याला 'पोपटपंची करू नको' असं म्हणतात. दुसऱ्यांच्या

शब्दांचा निर्बुद्ध पुनरुच्चार पोपट करतो, असं लोकांना वाटतं. मला हे बिलकूल मान्य नाही. माझ्या या मित्राचा सोळा वर्षं मी जो अनुभव घेतला त्यावरून सांगतो, की हे मुळीच खरं नाही. त्याच्या दोनतीनच गोष्टी इथं सांगतो.

गिरगावातल्या एका चाळीत माझे मामा राहत असत. तळमजल्यावर आमची खोली होती आणि खोलीच्या दारासमोर बाहेरच्या गॅलरीत पोपटाचा पिंजरा टांगलेला असे. रात्री त्याचा पिंजरा आम्ही आत आणून ठेवत असू. एका खोलीत आडवीउभी अंथरुणं घालून मामा, आजी वगैरे आम्ही तीन-चार माणसं गर्दी करून झोपत असू. त्याच गर्दीत कोपऱ्यातल्या एका खुर्चीवर पोपटाचा पिंजरा ठेवलेला असे. दिवे मालवून बिछान्यावर पडल्यापडल्या आम्ही काही गोष्टी बोलायला सुरुवात केली, की पोपट मधूनमधून 'हूं हूं' करत असे. जणू आपणही त्या गोष्टींत भाग घेतो आहोत असं तो दाखवत असे. केव्हा केव्हा आजी चिडून त्याच्यावर ओरडायची, ' काय मेला फाजील तरी! गप्प बस बघू.' मग थोडा वेळ तो गप्प राहायचा. काहीतरी गमतीची गोष्ट चालली असता आम्ही हसू लागलो, की अगदी माणसासारखा 'खू-खू-खू-खू' आवाज करून तो आमच्या हसण्यात सामील व्हायचा.

माझ्यावर तो वडिलकी कसा गाजवायचा ते पाहा. आमच्या चाळीच्या बाहेरच्या बाजूला एक चहाचं दुकान होतं. आमच्या शेजारच्या एका खोलीत दुकानाचे नोकरचाकर उठतबसत. दुसऱ्या खोलीत साखर, पीठ वगैरेचं कोठार होतं आणि जिन्याजवळच्या खोलीत भटारखाना होता. गॅलरीत त्यामुळं सारखी वर्दळ असे.

मी चारपाच वर्षांचा असताना घरातल्या आणि गॅलरीतल्या लोकांचा डोळा चुकवून गाडीघोडे बघायला एकदम रस्त्यावर धूम ठोकायचा. मग घरातलं कुणीतरी माझ्यामागं धावायचं आणि बकोटीला धरून मला फरपटत घरी ओढत आणायचं. गॅलरीतच आजी किंवा मामा माझ्या पाठीवर रपाटे देत असता पोपट शांतपणे मान वाकडी करून एका डोळ्यानं हे सर्व पाहत राहायचा. हा रस्त्यावर पळतो हे काही बरोबर नाही, हे त्यानं चांगलंच

ओळखलं होतं. गॅलरीत कुणी नाही, घरातली माणसं दुपारी स्वस्थ झोपली आहेत, असं पाहून एखाद्या दिवशी मी जर रस्त्याकडं धावलो तर पंखांचा फडफडाट करून आणि जीव जातो की राहतो अशा तऱ्हेनं ओरडून तो घरच काय, पण सारी चाळ जागी करायचा. मग कुणीतरी मला धरून आणत आणि दुपारची झोप मोडल्यामुळं अधिकच चिडून अधिकच धपाटे देत.

मारझोड संपून सर्व काही स्थिरस्थावर झालं, की माझ्यावर वडिलकी गाजवणाऱ्या त्या पोपटाच्या पिंजऱ्याकडं मी जात असे आणि पिंजऱ्यातून बाहेर आलेलं त्याचं शेपूट दातओठ खात ओढत असे. दुःखानं तो ओरडायचा; पण माझ्या बोटाचा त्यानं कधीच चावा घेतला नाही. त्याला चावता येत नव्हतं असं मुळीच नाही. गॅलरीतून जाणाऱ्यायेणाऱ्यानं कुणी शेपूट ओढून त्याला त्रास दिला तर तो त्याला चांगला कडकडून चावत असे; पण हा लहान मुलगा आहे, आपला मित्र आहे आणि विशेष म्हणजे आपल्यामुळं त्याला मार मिळाला आहे, तेव्हा आपण त्याला चावता कामा नये,एवढं त्याला समजत होतं.



माझा हा हिरवा मित्र जितका समजूतदार, तितकाच मिस्कीलही होता. चहावाल्याच्या भटारखान्यात दादा नावाचा एक धिप्पाड आचारी होता. रोज़ दुपारी शंकरपाळ्यांचे पीठ साखर घालून तो तिंबून ठेवत असे. पोपटाला ते गोड पीठ फार आवडायचं. दादाला चिडवण्याकरता चाळीतले लोक पुष्कळ वेळा त्याला 'जाड्या' म्हणून हाक मारत. दुपारी दादाचं पीठ तिंबून झालं, की तो एक लहानसा गोळा आणून आमच्या पोपटाच्या चोचीत द्यायचा.

पिठाचा गोळा घेऊन दादा येतो आहे हे पाहिल्याबरोबर दांडीवरून पिंजऱ्याच्या तळपत्र्यावर उडी मारून मोठ्या ऐटीत मान हालवत तुरुतुरु इकडंतिकडं फिरत पोपट दादाचं स्वागत करायचा. गोळा चोचीत देऊन दादाची पाठ फिरली रे फिरली, की दांडीवर उडी मारून तो गोळा एका पायात धरायचा आणि मान वर करून दादाला 'ए जाड्या, ए जाड्या' म्हणून तो हाक मारायचा.

दादा मागं वळून 'पुन्हा तुला कधी पीठ देणार नाही!' असं बोलून निघून जायचा; पण दुसऱ्या दिवशी नियमाप्रमाणं दादा यायचाच.

लहानपणचे अनेक लागेबांधे आणि नातीगोती मी विसरून गेलो आहे; पण माझ्या या हिरव्या मित्राला मी कधीतरी विसरेन का?

शब्दार्थ व टिपा :

**हेवादावा**—मत्सर; द्वेष. **कोठार**—धान्य साठवण्याची जागा. **भटारखाना**—हॉटेल किंवा खानावळीतील स्वयंपाकघर. **वर्दळ**—खूप लोकांची ये-जा. **लागेबांधे**—संबंध, नातेगोते.

**धूम ठोकणे**—जोराने पळणे.

**वडिलकी गाजवणे**—मोठेपणाचा अधिकार दाखवणे. **दातओठ खाणे**—रागाने चरफडणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. पशुपक्षी आपल्याला माणसांपेक्षाही जवळचे का वाटतात?
२. पोपटाच्या पिलाचा सांभाळ करताना काय काय करावे लागले?
३. दुसऱ्याच्या शब्दांचा पोपट फक्त निर्बुद्ध पुनरुच्चार करत नसतो, हे सांगताना लेखकाने कोणत्या गोष्टींचा दाखला दिला आहे?
४. पोपट आपली वडिलकी गाजवत असे, हे कोणत्या प्रसंगावरून दिसून येते?
५. पोपटाच्या मिस्कीलपणाच्या कोणत्या गोष्टी लेखकाने सांगितल्या आहेत?
६. 'माझ्या या हिरव्या मित्राला मी कधीतरी विसरेन का?' असे लेखकाने का म्हटले आहे?
७. (अ) तुमच्या आवडत्या पशुपक्ष्यांच्या काही आठवणी लिहून काढा.
   (आ) पोपटाचे चित्र काढून ते रंगवा.

***






# बीज पेरलं गेलं

चंदू बोर्डे

****************************************************************

**चंदू बोर्डे** (जन्म: १९३४)—प्रसिद्ध क्रिकेटपटू. आपल्या देशात तसेच परदेशांतही ते अनेक कसोटी सामने खेळले आहेत.

या नामांकित खेळाडूला बालपणापासूनच क्रिकेटच्या खेळाची गोडी होती. आपली ही आवड पुरवण्यासाठी ते कसे धडपडत असत, त्यासाठी त्यांनी काय काय श्रम घेतले, किती चिकाटी आणि जिद्द दाखवली हे सारे स्वतः चंदू बोर्डे यांनीच इथे सांगितले आहे.

..................................................................

माझा जन्म पुण्यात एका गरीब कुटुंबात झाला. माझे वडील त्या वेळेस पोलीस खात्यामध्ये तुटपुंज्या पगारावर नोकरी करत होते. तेव्हा साहजिकच गरीब कुटुंबाच्या वाट्याला येणारे सारे कष्ट, सारी दुःखं आम्ही भोगत होतो. अशा परिस्थितीत आम्हां मुलांसाठी खेळणी विकत घेणंसुद्धा वडलांना शक्य नव्हतं. दुसऱ्या मुलांच्या हातांत खेळणी पाहून आम्हांला त्यांचा हेवा वाटत असे. तरीपण गल्लीतील मुलांना जमा करून उन्हातान्हात विटीदांडू खेळणं, पतंग उडवणं, घरात जळणासाठी आलेल्या लाकडांतूनच बॅट व स्टंप तयार करून क्रिकेट खेळणं असा माझा दिवसभराचा कार्यक्रम असायचा.

त्यानंतर माझ्या आयुष्याला एक निराळंच वळण लागलं. माझे चुलते

पुण्याच्या वाय. एम. सी. ए. च्या आवारामध्ये राहत असत. ही संस्था खेळाकरता प्रसिद्ध असल्यानं बरेच लोक तिचे सभासद होते. ते रोज सकाळ-संध्याकाळ खेळायला येत असत. साहजिकच याचा परिणाम माझ्या बालमनावर होई. मुळातच खेळाची आवड असल्यानं मी त्यांचा खेळ लक्ष देऊन पाहू लागलो. अनेक खेळाडू पाहण्याची मला रोज संधी मिळू लागली.

शाळा सुटली रे सुटली, की धावत येऊन मी प्रथम क्रीडांगणावर हजर होत असे. सर्व खेळांत मला क्रिकेटचा खेळ फार आवडू लागला. याच खेळानं मला जास्त भुरळ पाडली. कधी कधी काही खेळाडू आपल्याला भरपूर खेळायला मिळावं म्हणून लवकर येत. इतर खेळाडू आलेले नसले,की ते मला चेंडू फेकायला बोलावत. मग काय, मला तर ती सुवर्णसंधीच वाटायची!

आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन! मिळणाऱ्या संधीचा पुरेपूर फायदा घेऊन मी अधिकच उत्साहानं जितक्या जोरानं चेंडू टाकता येईल तितक्या जोरात तो टाकून खेळाडूंची दांडी उडवण्याचा प्रयत्न करत असे. माझी ही कामगिरी पाहून मला उत्तेजन मिळावं यासाठी तेदेखील मुद्दाम आउट होत; तेव्हा मला ते कळत नसे आणि माझी छाती आनंदानं फुगत असे. मी आणखी जोरानं चेंडू फेकत असे. मात्र जेव्हा इतर खेळाडू येत, तेव्हा मला नाइलाजानं त्यांना चेंडू द्यावा लागे. तरीसुद्धा लांब उडालेला चेंडू चपळाईनं धावत जाऊन अडवण्यात आणि तो लगेच उचलून फेकण्यात मला कोण आनंद व्हायचा! आपणही त्यांच्याप्रमाणं खेळावं, असं मला फार वाटे. या हौसेपोटी रोजचा सराव संपल्यावर चेंडू गोळा करू लागणं, दुसऱ्या दिवसासाठी क्रीडांगणावर पाणी मारणं ही कामं मी आनंदानं करत असे. हे सर्व होत असता कधी कधी रात्रीचे आठ-आठसुद्धा वाजत. पुढच्या आयुष्यात क्रिकेट खेळाडू होण्याची खूणगाठ मी इथंच मनाशी बांधली.

त्यातच एक आनंदाची गोष्ट घडली. वाय. एम. सी. ए. मधील खेळाडूंकडून माझ्या आईवडलांना माझ्या खेळाबाबत स्तुतिपर उद्‌गार ऐकू येऊ लागले. माझे वडील व्हॉलीबॉल उत्तम खेळत. त्यामुळे ते मला खेळात नेहमीच प्रोत्साहन देत.

एकदा दुपारी त्यांचा जेवणाचा डबा घेऊन गेलो असताना त्यांनी मला दुकानात नेलं व एक जुनी बॅट विकत घेऊन दिली. त्या वेळी माझ्या वडलांचा मासिक पगार फार तुटपुंजा होता. ती बॅट पाहून माझा आनंद गगनात मावेना. लगेच ती घेऊन मी मित्रांना दाखवत सुटलो.

अभ्यास व शाळा या बाबतीत मात्र माझे वडील फारच कडक होते. एकदा मी शाळा चुकवून क्रीडांगणावर क्रिकेटचा सामना बघत बसलो होतो. वडलांनी मला पाहिलं. मी शाळा चुकवली हे त्यांना मुळीच आवडलं नाही. त्यांनी तडक मला शाळेत नेऊन बसवलं. त्या दिवसापासून मी कधीच शाळा बुडवली नाही.

ऑस्ट्रेलियाचा एक क्रिकेटसंघ १९४५ साली पुण्यात सामन्यासाठी आला होता. या सामन्याला तिकीट लावलं होतं.मैदानावर गोलाकार कनात होती. हा सामना पाहण्याची तर माझ्या मनात जबरदस्त इच्छा; पण तिकीट काढण्याची ऐपत नव्हती. त्यामुळं आमच्यासारख्या मुलांना आत जायचे मार्ग बंद होते; पण कसंही करून तो सामना पाहायचाच यासाठी माझी धडपड सुरू झाली.

सुदैवानं हा प्रश्न तिथल्या जवळपासच्या मोठाल्या झाडांनी सोडवला. माझ्या काही मित्रांसह झाडावर चढून मी दिवसभर सामना बघत होतो. असा सामना पाहण्यातला आनंद काही वेगळाच! तो अनुभव मी कधीच विसरणार नाही. आजही वाटतं, की पुन्हा एकदा असंच झाडावर चढावं आणि दिवसभर खेळ बघत बसावं.

त्या सामन्याचं वर्णन मी व माझे मित्र जोरजोरात हातवारे करून इतरांना ऐकवत होतो. दिवसाचा खेळ झाल्यावर कोणी झेल कसा घेतला, कसा सोडला, कुणाची दांडी कशी उडाली, कुणी चौकार कसा मारला याची रसभरित चर्चा करतच आम्ही बोलत बोलत घरी परतलो.

या सामन्याचा माझ्या मनावर फारच परिणाम झाला. विशेषतः सामना संपल्यावर खेळाडूंच्या स्वाक्षऱ्या घेण्यासाठी जी झिम्मड उडाली ते दृश्य पाहून तर मी भारावून गेलो! मनात आलं, की आपणही एक मोठा खेळाडू व्हावं. मग आपल्याभोवतीही अशीच स्वाक्षरीसाठी गर्दी होईल.

बस्स! तेव्हापासून माझ्या स्वाक्षरीच्या सरावाला सुरुवात झाली! विशेष

म्हणजे वर्गात बसल्याबसल्या वहीची अनेक पानं माझ्याच स्वाक्षरीनं भरू लागली. जर चुकूनमाकून शिक्षकांचं माझ्याकडं लक्ष गेलंच आणि त्यांनी प्रश्न विचारलाच तर नकळत माझ्या तोंडून, "हाऊज दॅट?" असं उत्तर बाहेर पडे! हे उद्गार ऐकून वर्गात एकच हशा पिके आणि माझी मान लाजेनं खाली होई!

थोड्याच दिवसांनंतर आंतरशालेय सामन्यात मी शंभर धावा केल्या, आणि सर्वांच्या डोळ्यांतील कौतुकाचे भाव पाहण्यासाठी लाजेनं खाली घातलेली हीच मान मी अभिमानानं वर केली!

माझ्या मनात क्रिकेटचं बीज पेरलं गेलं ते असं.



शब्दार्थ व टिपा.

**तुटपुंजा**—अगदी थोडा. **हेवा**—मत्सर. **कनात**—बाहेरून दिसू नये म्हणून सभोवार केलेला कापडी आडोसा. **स्वाक्षरी**—सही.

**भुरळ पाडणे**—आकर्षित करणे. **मनाशी खूणगाठ बांधणे**—मनात पक्का बेत करणे. **बीज पेरणे**—भावी गोष्टीची सुरवात होणे.

प्रश्न व स्वाध्याय:

१. लहानपणी बोर्डे यांना कोणकोणते खेळ आवडत?
२. वडलांनी मुलाला क्रिकेट खेळण्याचे प्रोत्साहन देण्यासाठी काय केले?
३. उत्तम खेळाडू व्हावे म्हणून बोर्डे यांनी स्वतः काय काय केले?
४. हेवा वाटणे, मनाशी खूणगाठ बांधणे, भुरळ पाडणे, बीज पेरणे या वाक्प्रचारांचा स्वतंत्र वाक्यांत उपयोग करा.
५. बॅट, स्टंप इत्यादी क्रिकेटच्या खेळातील इंग्रजी शब्द या पाठात आहेत. असेच क्रिकेटशी संबंधित असलेले आणखी काही शब्द मिळवा व त्यांना मराठी प्रतिशब्द कोणते आहेत यांची माहिती करून घ्या.
६. नामांकित खेळाडूंची चित्रे जमवा. ती वर्गफलकावर लावा.

***



# आजीनं पाहिलेला चोर

## व्यंकटेश माडगूळकर

*****************************************************

**व्यंकटेश दिगंबर माडगूळकर** (जन्म: १९२७)—कथा, कादंबरी, नाटक, प्रवासवर्णन असे विपुल लेखन यांनी केले आहे. 'माणदेशी माणसं', 'काळी आई', 'गावाकडच्या गोष्टी' इत्यादी कथासंग्रह. 'बनगरवाडी', 'करुणाष्टक', 'सत्तांतर' इत्यादी कादंबऱ्या.

'व्यंकटेश माडगूळकर यांच्या कथा' या संग्रहातून ही कथा घेतली आहे. घर म्हटले म्हणजे तिथे माणसे आलीच. घरातल्या प्रत्येकाचा स्वभाव वेगवेगळा असतो. त्यामुळे कधी कधी मोठी गंमत होते. एका रात्री लेखकाच्या घरात कशी गंमत उडाली ते पाहा.

.....................................................

आमच्या माडगूळच्या घरात चोर शिरल्याची घटना अजून माझ्या ध्यानात आहे.

आमचे दादा म्हणजे वडील हे साधे गृहस्थ होते. वरून काही जड पदार्थ डोक्यावर पडेल अशी भीती त्यांना नेहमी वाटे. त्यामुळं जरा काही आवाज झाला, की डोक्यावर रुमाल ठेवून ते तडक घराबाहेर पडत. या भीतीमुळंच घरातून वावरताना माझे वडील दारूगोळ्यानं भरलेल्या कोठारातून दिवा घेऊन सावधपणं वावरावं, तसं वावरत.

सरकारी नोकरीत कारकून म्हणून लागल्यानंतर दादांना एक नवीनच विकार सुरू झाला. रात्रीअपरात्री झोपेत ओरडायची त्यांना सवय जडली. विलक्षण भ्यालेला माणूस बारीक आणि लांबलचक आवाजात जसा ओरडतो तसं दादांचं ओरडणं असे. ते केव्हाही एकदम 'हू-हू-हू-हू-हू' अशा उंच स्वरात ओरडत. कधी कधी तर आपलंच ओरडणं ऐकून तेच जागे होत.

रात्री आपल्या कानांत गोम किंवा एखादा लहान किडा जाईल आणि मेंदूत घर करील या भीतीनं माझी आई रोज रात्री झोपताना कानांत कापसाचे बोळे घालत असे. तरीदेखील माझ्या सर्वांत मोठ्या बहिणीचं—अक्काचं—रडणं

आईला नेमकं ऐकू येत असे.

अक्का ही स्वभावानं वाळल्या पाचोळ्यावरसुद्धा पाय न देणारी. तिचं आणि विंचू या प्राण्याचं विशेष सख्य होतं! साधारणतः महिना-पंधरा दिवसांतून एकदातरी अक्काला विंचू चावत असे. आता घरात आम्ही इतकी माणसं होतो; पण सर्वांना सोडून तो नेमका अक्कालाच डसत असे. बरं, दिवसाउजेडी माणूस ओळखता येतं हे मान्य; पण रात्रीच्या काळोखात हीच अक्का आहे हे विंचवाला कसं कळत असावं? विंचवाची चूकभूल व्हावी म्हणून आम्ही अनेक प्रयत्न केले. अक्काला झोपण्यासाठी मधे जागा ठेवून आम्ही सगळे आजूबाजूला झोपूनही पाहिलं. तरीसुद्धा सर्वांना ओलांडून विंचू नेमका अक्काला गाठत असे!

त्यातल्या त्यात एक गोष्ट बरी होती—तिला विंचू फार चढत नसे. वर्षा-दोन वर्षांतून आईला जर विंचू चावला तर ती रात्रभर गडबडा लोळत असे आणि सगळं गाव आमच्या घरी जमा होत असे. कुणी हा उपाय करी, कुणी तो उपाय करी; पण चक्क दिवस उजाडून उन्हं वर आल्याशिवाय आईचा विंचू उतरत नसे. त्यामुळं अक्काला विंचू चावला म्हणजे उपचार करताकरताच आई सुटकेचा निःश्वास टाकून म्हणत असे, 'तरी बरं बाई, मला नाही डसला!'



आमची आजी नेहमीच भेदरल्यासारखी वागे, रोजची कामं आटोपली, थोडी सवड मिळाली म्हणजे घराचा एखादा अंधारा कोपरा बघून ती पाखरासारखी दोन पायांवर बसत असे आणि कुठंतरी एकटक बघत बोलत असे. तिचं बोलणं भ्यायल्यासारखं व कुणातरी जवळच्या माणसाला खाजगी आवाजात काही सांगावं तसं असे. का कुणास ठाऊक, शिपाई या प्राण्याची तिनं धास्ती घेतली होती. 'शिपाई येतील, धरून नेतील' असं ती सारखी पुटपुटे. त्यामुळं तिचं बोलणं कुणीच मनावर घेत नसे.



एका रात्री आमच्या घरात चोर शिरले. साधारणतः रात्री दोनअडीचचा सुमार असावा. आई, अक्का आणि आम्ही भावंडं माजघरात झोपलो होतो. आजी पुढच्या सोप्यात होती आणि वडील, त्याहीपुढं एक नवा सोपा होता,तिथं झोपले होते.

विंचू दिसावा म्हणून आई रात्री समई विझवत नसे; पण ती कितीही भरून ठेवली तरी तेल संपल्यामुळं ती कधीतरी विझून जाई आणि सगळीकडं गुडूप अंधार होई. आपल्या रिवाजाप्रमाणं त्या दिवशी समई विझली होती. या



अंधाराचा फायदा घेऊन चोर घरात शिरले. त्यांपैकी एका चोराला प्रथम आमच्या आजीनं पाहिलं.

घरामध्ये मोकळा चौक होता, त्याच्या डाव्या कोपऱ्यात तिला चोर उभा असलेला दिसला. आजी मधेच जागी होऊन अंथरुणावर उठून बसायला आणि तो कोपऱ्यात यायला एकच गाठ पडली! ओरडावं तर चोर पळून जाईल, म्हणून आजी हळूच दार ढकलून माजघरात आली. आई आणि अक्का कुठं कुठं झोपलेल्या आहेत हे तिनं आठवलं. कानांतल्या बोळ्यांमुळं हाक मारूनही आई कधीच जागी होत नसे. म्हणून ती हळूच अक्कापाशी आली आणि उशाशी बसून म्हणाली, ''अक्के अक्के, ऊठ, घरात चोर शिरलेत.''

अक्कानं हे ऐकलं आणि तिला एकदम रडूच आलं. कानांत बोळे असले तरी अक्काचं रडणं आईला ऐकू आलं. ती एकदम ताडकन उठली आणि म्हणाली, ''अक्का, कुठं चावला ग?''

आधीच भांबावलेली अक्का यावर काही सांगायच्याऐवजी जास्तच रडू लागली.

तिला समजावत आई म्हणाली, ''उगी उगी, अग रडून काय होणार? थांब दिवा लावते.''

इतकं चाललं आहे तोवर दादा ओरडू लागले. ते ओरडणं ऐकताच आजीला ठाम वाटलं, चोर दादांच्या उरावर बसला! ती एकदम ओरडली, ''अग, दिगूला धरला बग त्यांनी! त्याला वाचवा.''

आईला वाटलं, आजी नेहमीसारखी बडबडते आहे.

अक्का बिचारी आधीच रडत होती. त्यात चोरानं दादांना धरलं हे ऐकताच तिची शुद्धच हरपली.

मग आईनं हळूच उठून समई लावली आणि आपल्या समजुतीप्रमाणं विंचू चावून निपचित पडलेल्या अक्कासाठी ती सहाणेवर कसलीतरी मात्रा उगाळू लागली. उगाळता उगाळता ती म्हणत होती, ''बरं तर बरं, मला नाही डसला!''

इकडं मात्र आपलंच ओरडणं ऐकून दादांची झोपमोड झाली होती. ते उठून जांभया देत 'हरी हरी' म्हणत बसले होते. आत काय चाललं आहे याचा त्यांना

मुळी पत्ताच नव्हता!

थोडा वेळ गप्प झालेली आजी मधेच पुन्हा म्हणाली, "कोपऱ्यात बसलेला मी बघितला."

यावर आई म्हणाली, "मग चपलीनं चांगला ठेचायचा नाही का? चावला की पोरीला!"

यावर आजी घाबरून पुन्हा गप्प बसली.

आत दिवा लागला आहे आणि काहीतरी गोंधळ सुरू आहे, हे आता कुठं दादांच्या ध्यानात आलं. हिरव्या धाबळीची खोळ पांघरून ते माजघरात आले आणि विचारू लागले, "काय गडबड आहे? काय झालं?"

आई म्हणाली, "काही नाही, नित्याचंच रडगाणं आहे. अक्कीला विंचू डसला!"

मुलगा उठून आत आल्याचं पाहून आजी गडबडीनं उठली आणि दादांचा हात धरून त्यांना हळूच म्हणाली, "दिगू, अरे चोर शिरलाय घरात. बाहेरच्या त्या कोपऱ्यात बसलाय."

त्यासरशी गाव जागं करून मदतीला बोलवावं म्हणून दादा ओरडले, "चोर चोर!"

मात्रा उगाळायची सोडून मग आईही मोठ्यानं ओरडू लागली.

या गडबडीत आम्ही जागे झालो आणि रडू-ओरडू लागलो. गावातली कुत्रीही जागी होऊन भुंकू लागली.

आईनं घाबऱ्याघाबऱ्या पाटा, वरवंटा, दुभत्याची पेटी या अवजड वस्तू मागच्या आणि पुढच्या दारापाठीमागं रचल्या. आमचं ओरडणं चालूच होतं. एकच हलकल्लोळ झाला. एवढ्यात गावातले चार धीट लोक हातांत कंदील आणि काठ्यालाठ्या घेऊन धावून आले. बाहेरून हाका मारू लागले, "बापू, दार उघडा. बापू, भिऊ नका. आम्ही आहोत. कुठं आहे चोर?"

दादांनी आतूनच सांगितलं, "अंगणाच्या डाव्या कोपऱ्यात आहे. धरा धरा त्याला."

लोकांनी अंगणाचा डावा कोपरा बघितला, तर कुणाची तरी काळी-पांढरी

शेळी तोंड हालवत उभी होती.

"बापू, कोपऱ्यात चोर नाही. अहो, शेळी आहे शेळी. शेळीला भ्याला काय?"

चमकून दादा बघतच राहिले!

दरम्यान अक्का सावध झाली आणि विचारू लागली, "धरला का चोर?"

आई म्हणाली, "चोराचं मढं जाऊ दे तिकडं! तुझा विंचू उतरला का?"

अक्का गांगरून म्हणाली, "तो कधी चावला आणखी?"

"अग, मग तू मघा रडत का होतीस?"

"विंचू चावला म्हणून नाही. आजी मला म्हणाली अंगणाच्या कोपऱ्यात चोर लपलाय! त्यामुळं मला रडंच आलं."

यावर आई कपाळावर हात मारून म्हणाली, "काय बाई माणसं तरी, शहाण्यालाही वेडं करतील!" आणि आजीकडं बघत विचारलं, "काय हो, कुठाय चोर! शेळी म्हणजे चोर होय?"

आम्ही भावंडं इतका वेळ रडत होतो,ती आता मोठमोठ्यानं हसू लागलो.

शब्दार्थ व टिपा :

**निपचित**—हालचाल न करता पडलेला. **मात्रा**—ठराविक प्रमाणात उगाळून द्यायचे एक देशी औषध. **धाबळी**—लोकरीची जाडीभरडी शाल. **खोळ**—विशिष्ट **पद्धतीने दुमडून डोक्यावरून घेतलेली धाबळी हलकल्लोळ**—आरडाओरडा.

**वाळल्या पाचोळ्यावरसुद्धा पाय न देणे**—कुणालाही न दुखवणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. दादा, आई व आजी यांच्या स्वभावात कोणकोणता तऱ्हेवाईकपणा होता?
२. अक्काला विंचू चावू नये म्हणून घरातल्या मंडळींनी काय करून पाहिले?
३. घरात चोर शिरला असे आजीने सांगितल्यावर कुणी कुणी काय काय केले?
४. या कथेतील तुम्हांला आवडलेला गमतीदार प्रसंग सांगा.
५. ही कथा संवादरूपाने सादर करा.

***



# खोप्यामधी खोपा

**बहिणाबाई चौधरी**

********************************************************

**बहिणाबाई चौधरी** (जन्म: १८८०; मृत्यू: १९५१)—बहिणाबाई यांचा जन्म शेतकरी कुटुंबात झाला. त्यांना शालेय शिक्षण मिळाले नव्हते. घर, आपल्या भोवतालचा परिसर, कुटुंबीय व सहवासात आलेल्या अन्य व्यक्ती यांतून त्यांची कविता फुलत गेली. अस्सल अहिराणी बोलीत लिहिलेल्या त्यांच्या कवितेत जीवनातील अनुभवांचे चित्रण आढळते.

ही कविता त्यांच्या 'बहिणाईची गाणी' या संग्रहातून निवडली आहे. सुगरण पक्ष्याची मादी आपल्या पिलांसाठी फार सुबक घरटे विणते. या पाखरापासून माणसाला खूप काही शिकता येईल, असा विचार कवयित्रीच्या मनात येतो.



अरे खोप्यामधी खोपा
सुगरणीचा चांगला
देखा पिलांसाठी तिनं
झोका झाडाले टांगला

पिलं निजले खोप्यात
जसा झुलता बंगला
तिचा पिलांमधी जीव
जीव झाडाले टांगला

खोपा इनला इनला
जसा गिलक्याचा कोसा
पाखराची कारागिरी
जरा देख रे मानसा

तिची उलूशीच चोच
तेच दात तेच ओठ
तुले देले रे देवानं
दोन हात दहा बोटं

शब्दार्थ व टिपा :

**खोपा**—घरटे. **सुगरण**—एक पक्षीण. **इनला**—विणला. **गिलके**—घोसाळे. **कोसा**—वाळून सुकलेल्या घोसाळ्याचा सुंदर दिसणारा जाळीदार अवशेष.

**जीव टांगणे**—अतिशय काळजी वाटणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. सुगरणीच्या खोप्याला झुलता बंगला असे का म्हटले आहे?
२. 'जीव झाडाले टांगला' असे बहिणाबाई का म्हणतात?
३. सुगरणीच्या घरट्याचे वर्णन करताना झुलत्या बंगल्याशिवाय आणखी कोणत्या कल्पना केल्या आहेत?
४. 'तुले देले रे देवानं दोन हात दहा बोटं' या ओळीतून बहिणाबाईंनी काय सुचवलं आहे?
५. (अ) पाखरू, झोका, जीव, उलूशी आणि देव या शब्दांना समानार्थी शब्द सुचवा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
   (आ) 'जीव' या शब्दावरून 'जीव टांगणे' किंवा 'जीव टांगणीस लागणे' असे वाक्प्रचार झाले आहेत. 'जीव' या शब्दावर आधारलेले आणखी काही वाक्प्रचार शोधा व त्यांचा वाक्यांत उपयोग करून ती आपल्या वहीत लिहा.
६. घोसाळे किंवा दोडका या फळाचे वाळून सुकलेले अवशेष मिळवा व त्यांचा तुमच्या वर्गातील वस्तुसंग्रहात समावेश करा.

***



# चिमण्या आणि मुलं

**शिरीष पै**

******************************************************

**शिरीष व्यंकटेश पै** (जन्म: १९२९)—कविता, कथा व ललितलेख असे अनेक प्रकारचे लेखन यांनी केले आहे. 'एकतारी', 'एका पावसाळ्यात', 'आईची गाणी' इत्यादी कवितासंग्रह. 'मयूरपंख', 'कांचनबहार' इत्यादी कथासंग्रह.

हा ललितलेख 'आतला आवाज' या पुस्तकातून घेतला आहे. आपल्या घरात येऊन घरटे बांधणाऱ्या चिमणाचिमणीच्या एका जोडीचे वर्णन लेखिकेने इथे किती छान केले आहे पहा.

............................................................................................

तीन-चार महिन्यांपूर्वीची ही हकीकत. उजाडताच चिमण्यांची एक जोडी आमच्या घराच्या मधल्या खोलीत शिरली. भिंतीच्या प्रत्येक कोपऱ्यात जाऊन त्यांनी पंखांचा फडफडाट केला आणि भिंतीला चोची घासल्या. मला वाटलं, त्यांना घरटं बांधायचं असावं; पण अर्धा तास दंगा करूनही शेवटी कुठलीच जागा त्यांच्या मनाला आली नाही.

अखेरीस पंख्याच्या दांडीवर असलेल्या पोलादी वाटीच्या पोकळीतील जागा त्यांना आवडलेली दिसली. तिच्याभोवती गोल गोल फिरून त्या जागेची पुन्हा पुन्हा बारकाईनं पाहणी केली. ती जागा त्यांना सुरक्षित वाटल्यावर आळीपाळीनं त्यांनी त्या खोबणीत काड्या आणि कापूस आणून भरायला सुरवात केली. सारा दिवस मग त्यांनी तोच उद्योग चालू ठेवला. त्यांच्या ह्या कार्यक्रमामुळं खालच्या सतरंजीवर किती कचरा पडत होता याची त्या बिचाऱ्यांना काय कल्पना! पण चिमण्या आमच्या घरात प्रथमच घरटं बांधत होत्या. त्यामुळं त्यांना हुसकून लावायचं माझ्या जिवावर आलं.

शिवाय मनात आणखी एक उत्सुकता वाढली होती. या जोडीतली मादी अंडी घालील, ती अंडी उबवील, मग पिलं बाहेर पडतील, नरमादी पिलांच्या चोचींत चोच घालून त्यांना भरवतील, एक दिवस पिलांना पंख फुटतील आणि



ती भुर्रदिशी उडून जातील—हे सारं आपल्याला मनसोक्त जवळून पाहायला मिळेल, या कल्पनेनं मला आनंद वाटला.

संध्याकाळी कचेरीतून मी परत आले अन् आमच्या नव्या पाहुण्यांना भेटायला मधल्या खोलीत धावले. बघते, तो पंख्याच्या वरच्या खोबणीतली ती जागा कुणीतरी साफसूफ करून टाकलेली! माझं मन एकदम खट्टू झालं. बरोबर. आजच गड्याला घर साफ करायचा मी हुकूम दिला होता ना! माझे सारे बेत मनातल्या मनात विरघळले. केवढं सूक्ष्म निरीक्षण करायचं ठरवलं होतं मी! शिवाय मी मुलांनाही पक्ष्यांची माहिती प्रात्यक्षिकांसह देणार होते; पण आता काय! सारंच फिसकटलं होतं.

मी निराश झाले, तरी चिमण्या मात्र निराश झाल्या नव्हत्या. त्यांच्या चिवचिवाटात पूर्वीचाच उत्साह भरला होता. दुसऱ्या दिवशी सकाळी त्यांनी पुन्हा नव्या दमानं जागा शोधायला प्रारंभ केला. एकूण आमचं घर त्यांना पसंत होतं आणि ते त्यांना सोडायचं नव्हतं. पंखांचा फडफडाट करत आणि चिवचिवाटानं घर डोक्यावर घेत त्या आमच्या खोल्यांतून सारख्या भिरभिरत होत्या. मुलं त्यांच्यामागं त्यांना हुसकावत धावत होती नि मी त्यांना 'मुक्या प्राण्यांना असा त्रास देऊ नये,' असं सांगत त्यांच्यामागं फिरत होते.

शेवटी शौचकूपामधल्या फुटक्या झडपेच्या नि खिडकीवरील जाळीच्या दरम्यानची पोकळ जागा त्यांना एकदाची पसंत पडली. त्या भराभर काड्या, चिंध्या, पाचोळा, गुंतवळ, कापूस इत्यादी वस्तू आणून तिथं भरत होत्या आणि

मी मुलांना ते घरटं बांधण्याचं काम दाखवत होते. चिमण्या आपल्या कामात मोठ्या रंगून गेल्या होत्या.

एकूण या चिमण्यांचं बस्तान आमच्या बिऱ्हाडी नीट बसेल या समाधानात आम्ही होतो.

घरट्याच्या बांधकामावर देखरेख ठेवण्याचा आमचा उत्साह दोनतीन दिवसच टिकला. मग रोजच्या व्यवहारात आम्ही गुंतलो.

एके दिवशी अचानक माझं लक्ष त्या घरट्याकडं गेलं. अरे बापरे! चिमण्यांनी चांगलं आडवंच्या आडवं घरटं तयार केलं होतं. माझी चाहूल लागताच चिऊताई घरट्यातून बाहेर सटकल्या आणि भुर्रदिशी उडून गेल्या. हं, एकूण अंडीही घालून झाली होती तर! आता पिलांच्या जन्माकडं माझं लक्ष लागून राहिलं.



एका सकाळी माझा मोठा मुलगा मला ओढत ओढत नेत म्हणाला, ''अग आई, आई, चिमणीची पिलं किलबिलताहेत बघ!''

मी पाहिलं तो काय! खरंच की, घरट्यामधे कोवळ्या स्वरांत पिलांचा चिवचिवाट चालला होता. चिमणा नि चिमणी मधूनमधून चोचींतून काहीतरी आणून पिलांना भरवत होती. पण चिमण्यांनी ते घर असं काही विचित्र बांधलं होतं, की आतल्या घडामोडींचा बाहेर कुणाला पत्ता लागत नव्हता. मुलांना ती पाखरं पिलांना कशी भरवतात ते दाखवणार होते; पण माझा विरस झाला. शेवटी मीच घरट्यात डोकावून पाहिलं; पण घरट्याचं तोंड बाहेरच्या बाजूला असल्यानं काही दिसेना. शेवटी कंटाळून मी खाली उतरले नि चिमण्यांचा नाद सोडून दिला.

असे किती दिवस गेले कुणास ठाऊक! आठवण झाली म्हणून एक दिवस पाहिलं. घरटं ओकंबोकं पडलं होतं. चहूकडं शांत होतं. ह्या वेड्या पिलांना पंख फुटले कधी? ती उडून गेली कधी? सारंच बघायचं राहून गेलं.

आज पुन्हा चिमण्या घरात शिरल्या आहेत. त्या पूर्वीच्याच चिमण्या नसतील ना? कुणास ठाऊक! फिरून आज त्या उगवल्या आहेत. घरात त्यांच्या चिवचिवाटानं पुन्हा एक नवं चैतन्य निर्माण केलं आहे. मुलांना कोण आनंद झाला आहे!



शब्दार्थ व टिपा :

**खोबण**—खोलगट भाग, पोकळी. **मनसोक्त**—मनाचे भरपूर समाधान होईपर्यंत. **प्रात्यक्षिक**—प्रत्यक्ष करून दाखवलेली गोष्ट, प्रयोग. **ओकेबोके**—सुनेसुने. **चैतन्य**—जिवंतपणा.

**मनाला येणे** — आवडणे, पसंत पडणे. **जिवावर येणे** — एखादी गोष्ट करायला अगदी नकोसे वाटणे. **मन खट्टू होणे**—नाराज होणे. **घर डोक्यावर घेणे**—गडबड, गोंधळ करून दणाणून सोडणे, त्रास देणे. **बस्तान बसणे**—जम बसणे, व्यवस्था लागणे. **नाद सोडणे**—एखादी गोष्ट मनातून काढून टाकणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. घरटे बांधण्यापूर्वी चिमण्यांनी काय काय केले?
२. कोणती गोष्ट करण्याचे लेखिकेच्या जीवावर आले?
३. चिमण्यांनी घरटे बांधल्यावर लेखिकेला विशेष आनंद का वाटला?
४. कचेरीतून परत आल्यावर लेखिकेचे मन खट्टू का झाले?
५. शेवटी चिमण्यांनी आपले बस्तान कोठे व कसे बसवले?
६. (अ) 'फिरून त्या उगवल्या आहेत.' या वाक्यात 'उगवणे' याचा अर्थ 'अकस्मात येणे' असा आहे. 'उगवणे' याचे आणखीही काही अर्थ होतात. खालील शब्दांबरोबर त्यांचा उपयोग करून ते अर्थ समजून घ्या:
सूर्य, रोप, सूड.
(आ) 'फडफडाट' हा आवाजाची सूचना देणारा शब्द आहे. या पाठातील याच प्रकारचे इतर शब्द शोधून काढा.
(इ) 'हं, एकूण अंडीही घालून झाली होती तर!'
'मी पाहिलं तो काय!'
या दोन्ही वाक्यांत बोलण्याची एक विशिष्ट लकब जाणवते.यासारखी आणखी काही वाक्ये तयार करा.
७. वेगवेगळ्या पक्ष्यांच्या घरट्यांची माहिती मिळवा व त्यांतील विविधता आपल्या वहीत टिपून ठेवा.

***



# दगड शोधू या

## दि. के. बेडेकर

************************************************************

**दिनकर केशव बेडेकर** (जन्म: १९१०; मृत्यू: १९७३)—विचारवंत आणि टीकाकार. 'साहित्यविचार', 'विचारयात्रा', 'धर्मचिंतन' इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

माणूस कोणता ना कोणतातरी छंद जोपासतो. बेडेकरांना दगड जमवण्याचा छंद होता. या दगडांतून वेगवेगळे सुंदर आकार त्यांना जाणवतात. त्यासंबंधीचे आपले अनुभव त्यांनी इथे सांगितले आहेत.

---

परवा माझे एक मित्र नाशकाहून आले. मोठ्या आस्थेनं माझ्या हातात एक पिशवी देत म्हणाले, ''आमच्या अवीनं हे तुमच्यासाठी गोळा केले आहेत.'' पिशवीतून मी पाचसात लहानमोठे दगड काढले. एक दगड हिरवा निमुळता होता. दुसरा नेहमीचा काळा दगड; पण ओढ्याच्या पाण्यात बराच वेळ राहिल्यामुळे त्याला एक गमतीचा आकार आला होता— कुत्र्याच्या तोंडासारखा!

अवीसारखे माझे असे 'दगड-मित्र' कुठं कुठं पसरले आहेत. या मैत्रीसाठी आमची वयाची वगैरे काही अट नाही. अवीचं वय सात आहे, तर दुसरे एकजण पन्नास वर्षांचे आहेत.



दगड शोधण्याचं हे वेड तर खरंच; पण ते गमतीचं आहे आणि गमतीचं आहे म्हणूनच मुलांनासुद्‌धा ते सहज लागतं.

माझ्या घरी मी खूप दगड जमवून त्यांच्या वेगवेगळ्या राशी करून ठेवल्या आहेत. काही दगड पांढरे, लांब व निमुळते आहेत. काही दगड नदीत घासून घासून चपटे किंवा अंड्यासारखे गोल गुळगुळीत झालेले आहेत. काही तांबूस ठिपक्यांचे आहेत. काही दगड खरे तर दगड नाहीतच, कन्याकुमारीहून मी आणलेले ते पोवळ्याचे तुकडेच आहेत. माझ्यापाशी काही दगड आहेत, ते कश्मीरला झेलमच्या वाळूत मला मिळाले. माझ्या मुलाला परवा त्याच्या एका मित्रानं एक दगड दिला. तो इतका जड व काळा आहे, की तो एक लोखंडाचा तुकडाच वाटावा. रंगीबेरंगी गुळगुळीत दगडही माझ्या दगडांच्या राशींत पुष्कळ आहेत.

एकदा माझा एक मित्र घरी आला. माझा दगडांचा संग्रह पाहून तो म्हणाला, "तुम्ही खास अभ्यासासाठी हे गोळा केलेले दिसतात."

"छे! छे! केवळ सुंदर दिसतात म्हणून मी हे जमवले आहेत."

त्या मित्राला मग दगडाचा एक कुत्रा दाखवत मी म्हणालो, "विसावा घेत पुढचे पाय पुढं पसरून बसलेला हा कुत्रा आता दिसतो तसा पूर्वी नव्हता. चार पाय व नुसतं धड एवढंच प्रथम होतं. 'तोंड पाहिजे!' अशी त्याची मागणी होती!"

मित्र म्हणाला, "या राशीतून त्याचं तोंड मिळालेलं दिसतंय तुम्हांला."

"कुत्र्यांच्या तोंडासारखे दोन-चार दगड माझ्यापाशी होते. मी खूप शोधून पाहिलं, पण एक फार मोठा होता. तो आकारानं जमेना. दुसरा लहान पण काळा होता. तो रंगानं जमेना. असं होत होत शेवटी मी निराश झालो. असेच दोन-चार महिने लोटले. आमच्या शेजारी एक बंगला आहे. एक दिवस त्याच्यासमोर मोठे खडे असलेली वाळू पसरण्यात आली. मी आणि माझा मुलगा त्या बंगल्यासमोरून जात होतो, एवढ्यात माझा मुलगा मला म्हणाला, 'आपल्या कुत्र्याचं मुंडकं पडलेलं दिसतंय त्या वाळूत!'

"मी पाहतो, तो खरंच तसं होतं! मग मुलानं तो दगड आणला. आम्ही मग घरी आलो व आमच्या टिपूला मुंडकं लावलं. ते इतकं बेमालूम लागलं, की जणू काही टिपूनंच आम्हांला त्या बंगल्याकडं जायला सुचवलं असावं."

किंचित थांबून मी पुढे म्हणालो, "आता टिपूच्या शेपटीचा प्रश्न आला. त्याची बसण्याची ऐट, हुशार सावध नजर आणि तोंड पाहून आम्ही म्हटलं, की याला झुपकेदार मोठी शेपटी हवी. सुदैवानं शेपटी आमच्या दगडांच्या साठ्यातच सापडली. मग आम्ही सिमेंट कालवून एक छान बैठक तयार केली आणि त्यात टिपूला बसवलं. सिमेंटनं मुंडकं जोडून पक्कं केलं आणि शेपटी बसवली. आता हा टिपू बघा कसा छान दिसतोय!"

दगड जमवण्यात अशी गंमत आहे. कुत्री, हत्ती, निरनिराळ्या तऱ्हेचे पोशाख केलेल्या स्त्रिया, फेटे बांधलेले मिशीवाले पुरुष या दगडांतून जणू आपोआप बाहेर आले आहेत!

एकदा असं झालं, की आम्ही कार्ल्याच्या लेण्यांजवळ हिंडत होतो. तिथं बाजूच्या एका खड्ड्यात वीतभर लांबीचा गुळगुळीत दगड दिसला. मी तो उचलायला गेलो; पण तो अडून बसला. मग माझी मुलगी भलाभक्कम चाकू घेऊन आली. त्याने तो दगड मी सोडवू लागलो. अर्धा तास धडपड करून आम्ही तो बाहेर काढला. तो भला मोठा व विचित्र दगड होता. पिवळट व मोठ्या चमत्कारिक आकाराचा तो दगड घेऊन आम्ही पुण्याला आलो. एक वेगळा दिसणारा दगड म्हणून आम्ही तो ठेवून दिला.

एक दिवस तो दगड कुणी कसा हलवला कुणास ठाऊक! मला एक विलक्षण दृश्य दिसलं. एक माणूस माझ्याकडं पाहत होता: पण त्या माणसाला दोन डोळ्यांऐवजी नाकाच्या वर एकच डोळा होता. नाक नकटं व टोकाशी थोडं मुडपलेलं होतं. त्या माणसाची जिवणी जरा मोठी होती व तोंड किंचित उघडं होतं. आत जीभ दिसत होती; पण त्याचा डोळा मात्र मोठा विलक्षण होता. मी एका उंच ठिकाणी त्या माणसाला आता ठेवलं आहे. एकाच डोळ्याचा तो माणूस मातीत सापडला, त्या वेळी त्याचं नाक खाली होतं व डोळाही भुईतच होता. पण तरी तो वाट पाहत असावा की कुणीतरी कधीतरी आपल्याला या

मातीतून वर काढील आणि मग आपण सृष्टीची सारी रंगत पाहू.

असं हे घडतं; पण त्यासाठी आपण दगड शोधले पाहिजेत. दगडांतले आकार आणि रंग शोधले पाहिजेत. त्यासाठी खूप भटकलं पाहिजे व भटकताना डोळे उघडे ठेवले पाहिजेत.

दगड लहान किंवा मोठा कसाही असला किंवा कोणत्याही रंगाचा असला तरी तो उचलावा. फक्त त्याला आकाराचा काहीतरी वेगळेपणा हवा. रंगीत दगड तर हवेतच. दगड सापडला, की लगेच त्यात सबंध कुत्रा किंवा माणूस दिसून येत नाही. तशी घाई न करता दगड धुऊन स्वच्छ करून जमवून ठेवावे व त्यांच्याकडं एकटक पुन्हा पुन्हा पाहत राहावं. हळूहळू त्यांच्या आकारातून काही ना काही दिसू लागतं; पण काही वेळा हत्तीचं शरीर किंवा त्याची नुसतीच सोंड दिसेल. हत्तीच्या शरीराचा दगड मिळाला तर सोंडेचाही मिळेल अशा शोधात असावं. माझा बिनसोंडेचा एक हत्ती एक-दोन वर्षं तसाच पडून होता; पण शेवटी त्याची सोंड मिळाली आणि तो पूर्ण झाला.

यासाठी अर्थातच माणूस व इतर प्राणी यांच्या शरीरांची व अवयवांची



ठेवणही मनात असली पाहिजे. दगडात कुत्र्याचा आकार दिसण्यासाठी आपल्या मनात कुत्र्याचं चित्र हवं. म्हणजेच चित्रकलेची आवड हवी. मातीची चित्रं करण्याचाही छंद हवा. मुख्य म्हणजे दगडांवर आणि या दगडमातीतून उगवणाऱ्या हिरव्या वनस्पतींवर व पृथ्वीवर वावरणाऱ्या प्राण्यांवर प्रेम हवं. दगडांमध्ये रंग, आकार, स्फटिक आहेतच. आपल्या रंगांतून व आकारांतून काय निर्माण होईल हे तुम्हांला सांगण्याइतका समजूतदारपणा दगडांतसुद्धा तुम्हांला आढळेल. तुम्ही फक्त डोळे उघडे ठेवून पहा म्हणजे झालं.

शब्दार्थ व टिपा :

**आस्था**—आपुलकी; प्रेम. **पोवळे**—कीटकजन्य तांबड्या रंगाचा एक दगड—खडा. **धड**—डोक्याविना शरीर. **जिवणी**—ओठांची ठेवण. **स्फटिक**—पैलू असलेला चमकदार पारदर्शक दगड.

**कार्ल्याची लेणी**—पुणे-मुंबई रस्त्यावर मळवलीजवळ कार्ले नावाचे छोटे गाव आहे. तिथे एका डोंगरात खोदलेली बौद्ध लेणी.

प्रश्न व स्वाध्याय :

१. लेखकाने कोणता छंद जोपासला?
२. लेखकाकडे कोणकोणत्या प्रकारचे दगड होते?
३. जमवलेल्या दगडांतून कुत्र्याचा आकार कसा तयार झाला?
४. आपल्या कोणत्या मित्रांना लेखक 'दगड-मित्र' म्हणतो? का?
५. माणसाने डोळे उघडे ठेवून भटकावे असे लेखक का म्हणतो?
६. दगडांतले विविध आकार दिसण्यासाठी आपल्या अंगी कोणकोणते गुण असायला हवेत?
७. दगडांप्रमाणे लाकूड, काटक्या अशा अन्य वस्तूंतही निरनिराळे आकार जाणवतात. अशा वस्तू शोधून जमवा व त्यांना सुंदर आकार देण्याचा प्रयत्न करा.
८. (अ) समानार्थी शब्द द्या:
   मुंडके, निमुळ्ता, भुई.
   (आ) 'बिनसोंडेचा' म्हणजे सोंड नसलेला. यासारखे आणखी काही शब्द शोधा व त्यांचा वाक्यात उपयोग करा.

***

# १ वासरू

अनिल

************************************************************

**आत्माराम रावजी देशपांडे** (जन्म: १९०१; मृत्यू: १९८२) — 'फुलवात', 'पेर्ते व्हा', 'सांगाती' असे यांचे अनेक कवितासंग्रह आहेत. 'भग्नमूर्ती', 'निर्वासित चिनी मुलास' ही त्यांची दीर्घकाव्ये प्रसिद्ध आहेत. त्यांना 'पं. नेहरू साक्षरता-कार्य पारितोषिक' मिळाले; त्यांच्या 'दशपदी' या काव्यसंग्रहाला साहित्य अकादमीचे पारितोषिकही मिळाले.

ही कविता 'पेर्ते व्हा' या कवितासंग्रहातून घेतली आहे. रानात वाट चुकलेल्या एका वासराचे शब्दचित्र या कवितेत कवीने रेखाटले आहे.

.................................................................

ओढाळ वासरू रानी आले फिरू
कळपाचा घेरू सोडूनिया

कानांमधे वारे भरूनिया न्यारे
फेर धरी फिरे रानोमाळ



मोकाट मोकाट, अफाट अफाट
वाटेल ती वाट धावू लागे

विसरूनी भान भूक नि तहान
पायांखाली रान घाली सारे

थकूनिया खूप सरता हुरूप
आठवे कळप तयालागी

फिरू जाता मागे दूर जाऊ लागे
आणखीच भागे भटकत

पडता अंधारू लागले हंबरू
माय! तू लेकरू शोधू येई.

शब्दार्थ व टिपा :

**ओढाळ**—उनाड—कळपातून फुटून बाहेर चरणारे. **घेरू**—घेर; वेढा. **मोकाट**—अनिर्बंध—कसलेही बंधन नसलेले. **अंधारू**—अंधार.

प्रश्न व स्वाध्याय :

१. वासरू कुठे हिंडत राहिले? का?
२. हिंडून हिंडून थकल्यावर वासराला कोणाची आठवण झाली?
३. अंधार पडल्यावर वासरू का हंबरू लागले?
४. मोकाट मोकाट, अफाट अफाट—यांत एकच शब्द दोनदा आला आहे, त्यामुळे मूळ शब्दाचा अर्थ दुणावतो. शब्दांच्या अशा आणखी काही जोड्या तयार करा.
५. कानांत वारे भरणे, तहान-भूक विसरणे, रान पायांखाली घालणे—यांतील अर्थ समजून घेऊन त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

***

# निसर्ग माझा सोबती

१०

**प्र. के. अत्रे**

**************************************************************

**प्रल्हाद केशव अत्रे** (जन्मः १८९८; मृत्यूः १९६९)—'आचार्य अत्रे' या नावाने विशेष परिचित. विनोदी लेखक, कवी, नाटककार, पत्रकार म्हणून विशेष प्रसिद्ध. 'गुरुदक्षिणा', 'साष्टांग नमस्कार', 'मी उभा आहे' ही व इतर अनेक नाटके. 'केशवकुमार' या टोपण नावाने 'झेंडूची फुले' हा विडंबन कवितांचा संग्रह. 'कऱ्हेचे पाणी' हे आत्मचरित्र. त्यांनी लिहिलेल्या आणि दिग्दर्शित केलेल्या 'श्यामची आई' या चित्रपटाला राष्ट्रपतींचे सुवर्णपदक मिळाले आहे.

हा उतारा त्यांच्या आत्मपर लेखनातून संकलित केला आहे. इथे लेखकाने निसर्गाचे सुंदर वर्णन तर केले आहेच; पण त्याबरोबर एकूण जीवनाकडे उघड्या डोळ्यांनी पाहिले तर तिथे किती मौज आढळते, हेही लेखकाने कसे छान सांगितले आहे, पहा.

..................................................................

लहान मुलं रस्त्यानं जाताना जशी रमतगमत जातात ना, तसा मी आयुष्यातून रमतगमत चाललो आहे. वाटेत फूल दिसलं, त्यावर कविता कर; मूल दिसलं, त्याला गोष्ट सांग; उदास चेहऱ्याचा माणूस दिसला, त्याला हसव; गर्दी दिसली, तिच्यापुढं व्याख्यान दे; कोणी महापुरूष भेटला, त्याचा जयजयकार कर; एखादा मोर्चा आढळला, त्याच्यात सामील हो. असं सारखं चाललंय. आयुष्यातल्या प्रत्येक गोष्टीबद्दल मला जिज्ञासा आहे. खिडकी उघडी दिसली, की मांजर जसं आत डोकावतं, तशी जीवनात डोकावण्याची मला फार हौस आहे. सारं आपल्याला दिसलं पाहिजे, समजलं पाहिजे अन् आलं पाहिजे असं मला वाटतं.

काय मौज आहे जीवन म्हणजे! या जीवनाचा कितीही आस्वाद घ्या, आपल्या मनाची तृप्तीच होत नाही. हीच जीवनाची गंमत आहे. या मेजवानीत एक का रस आहे? या मैफलीत एक का सूर आहे? किती चाखाल अन् किती ऐकाल! जग उत्पन्न होऊन इतकी वर्षं झाली; पण रोज सकाळी ते नवीनच जन्माला येतं आहे, असं वाटतं. सूर्योदयाचं आणि सूर्यास्ताचं सोनं

पहिल्यासारखंच पिवळंधमक आहे. आभाळाचा निळा रंग अजून विटला नाही. कळ्याफुलांचा सुगंध अजून उडाला नाही. तृणांची हिरवीगार मखमल अद्यापि टवटवीत आहे.

लहानपणापासूनच निसर्गाची मला सोबत मिळाली. नद्या, डोंगर, झाडं, वेली यांच्या संगतीत मी वाढलो. सकाळी उठलो, की अंगावर सोनेरी उन्हं पांघरायची. रात्र झाली, की अंगावर चांदण्याची निळी चादर ओढून अंगणात झोपी जायचं.

पुढं शहरात राहायला आलो तरी निसर्गाची संगत मी सोडली नाही. मुंबईत समुद्र हा माझा सोबती आहे. त्याच्या भरतीच्या आणि ओहोटीच्या लाटांवर माझं मन नाचत असतं. पहाटेच्या वेळी अंगावर लाटांचे तुषार झेलत, ओल्या आणि भुसभुशीत वाळूवर अनवाणी चालण्यात केवढा आनंद आहे! पण पुष्कळ लोक पायांत बूट घालून अन् सारं अंग लोकरी कपड्यांत पॅकबंद करून समुद्रावर हिंडायला येतात. जणू अंगात चिलखत घालून ते त्याला भेटायला येतात. मी त्यांना म्हणतो, "अरे, समुद्राचं पाणी घ्या थोडं अंगावर. त्याचा वास शिरू द्या तुमच्या नाकातोंडात," पण कोण ऐकतोय?

मुंबईच्या समुद्राप्रमाणं खंडाळ्याचा डोंगरही माझा मित्र आहे. या डोंगरावर माझं एक घर आहे. फुरसत मिळाली की मी तिथं जाऊन राहतो. तिथं रायवळ आंबे, फणस, काजू आणि जंगली झाडं खूप आहेत. माझ्या एका वाढदिवशी मी डोंगराच्या उतारावर हापूस नि पायरी यांची दीडशे झाडं लावली. सानेगुरुजींना ही गोष्ट समजली, तेव्हा त्यांनी मला पत्रानं कळवलं—झाडं लावून वाढदिवस साजरा करण्याची तुमची कल्पना मला फारच आवडली.

खंडाळ्याला गेलो, की माणसांचं जग मी पार विसरून जातो. उंच उंच डोंगर, निळंभोर आभाळ आणि बघावं तिकडं झाडं, वेली अन् झरे. त्यांच्या संगतीत दिवस कसा निघून जातो, हे कळतही नाही!

आमच्या खंडाळ्याला पावसाळ्याचं सौंदर्य काही विलक्षणच असतं! आठ-आठ, दहा-दहा दिवस एकसारखी पावसाची झड लागून राहते. जागजागी वाहणारे शेकडो स्फटिकशुभ्र झरे आणि भोवताली दिसणाऱ्या पाचूच्या रंगाच्या

हिरव्यागार वनस्पती यांमुळे वातावरणात एक निराळंच चैतन्य निर्माण होतं. सकाळच्या प्रहरी 'पावशा' या नावाचा एक पक्षी माणसासारखी शीळ घालू लागतो. हिवाळ्यात तर पांढऱ्या धुक्याचे लोट बोल बोल म्हणता दऱ्याडोंगर ओलांडून आमच्या घरात शिरतात आणि समोरचंदेखील दिसेनासं होतं.

झाडांना हालता येत नाही, बोलता येत नाही. ती एकाच जागेवर उभी असतात; पण त्यांच्या जगात नेहमी काही ना काही उलाढाली चाललेल्या असतात. जुन्या झाडांची पानं गळत असतात. नवीन नवीन पानं फुटत असतात. काहींना फुलं येतात तर काहींना मोहोर येतो. झुडपांवर तुरे डोलत असतात. वेलींवर कळ्या हसत असतात. हिरव्या सृष्टीतल्या या लहानमोठ्या रहिवाशांना स्वस्थपणा कसा तो नसतोच.

खंडाळ्याला असलो म्हणजे अगदी झुंजूमुंजू व्हायच्या आत मी उठतो. बाहेर येऊन पाहावं, तर डोंगरावरची सगळी हिरवी मंडळी केव्हापासूनच जागी झालेली असतात. मोठमोठी झाडं पहाटेच्या वेळी लहान लहान पाखरांबरोबर कसल्या गप्पा करत असतात कुणास ठाऊक!



मी त्यांना म्हणतो, "अरे निजा, इतक्या सकाळी रे कशाला उठलात?"

पण ती माझं थोडंच ऐकतात? वेली मला म्हणतात, "ह्या बघा, आम्हांला कशा कळ्या आल्या आहेत!" रोपटी म्हणतात, "हे पहा, आम्हांला कसे धुमारे फुटले आहेत!"

हातात झारी घेऊन मी त्यांना पाणी घालू लागतो. तेव्हा अंग घुसळून ती अशी काही हसतात अन् डोलतात म्हणता! जशा काही मी त्यांना गुदगुल्याच करतो आहे.

तासन्तास मी वेलींशी नि झुडपांशी असा खेळत बसतो.

शब्दार्थ व टिपा :

**तृप्ती**—समाधान. **मैफल**—गाण्याबजावण्याची बैठक. **पाचू**—हिरव्या रंगाचे एक रत्न. **झुंजूमुंजू**—पहाटेचा मंद प्रकाश. **धुमारा**—झाडाला किंवा वेलीला फुटलेला जोरदार नवा अंकुर.

**खंडाळा**—पुणे-मुंबई रस्त्यावरील थंड हवेचे एक ठिकाण.

प्रश्न व स्वाध्याय :

१. 'काय मौज आहे जीवन म्हणजे!' असे आचार्य अत्रे का म्हणतात?

२. लेखकाने शहरातही निसर्गाची संगत सोडली नाही, हे कशावरून दिसून येते?

३. खंडाळ्यातील पावसाचे वेगळेपण कोणते?

४. झाडाझुडपांच्या जगात नेहमी कोणत्या उलाढाली चाललेल्या असतात?

५. 'सूर्योदयाचं आणि सूर्यास्ताचं सोनं', 'चांदण्याची निळी चादर' या सुंदर कल्पना आहेत. पाठातील अशाच आणखी काही सुंदर कल्पना सांगा.

६. (अ) 'बोल बोल म्हणता' म्हणजे लगेच. याच अर्थाचे आणखी काही वाक्प्रचार सांगा व त्यांचा वाक्यात उपयोग करा.

(आ) 'या मैफलीत एक का सूर आहे?' याचा अर्थ अनेक सूर आहेत. या पद्धतीची आणखी काही प्रश्नार्थक वाक्ये तयार करा.

७. समुद्रकाठी, नदीतीरावर किंवा डोंगरावर सहल काढा व निसर्गाच्या संगतीचा आनंद लुटा.

***

# ११ कल्पकतेचे वरदान

## पद्मजा फाटक

***************************************************************

**पद्मजा फाटक** (जन्म: १९४२)—'राही' हा कथासंग्रह, 'गर्भश्रीमंतीचे झाड' हा ललितलेखांचा संग्रह आणि 'शिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडक' हे चरित्र यांनी लिहिले आहे.

ही कथा 'बालवाडी' या नियतकालिकातून घेतली आहे. तुकाराम हा तुमच्यासारखाच शाळेत शिकणारा एक मुलगा. प्रतिकूल परिस्थितीमुळे त्याला शिक्षण घेणे अवघड होते. पण या साऱ्या अडचणींतून तो कशी वाट काढतो ते बघू या.

...............................................................



तुकाराम नावाचा एक गरीब मुलगा होता. एका म्हाताऱ्या आजीशिवाय त्याला आपले असे दुसरे कुणी नव्हते. आपली शाळा सांभाळून त्याला खूप काम करावे लागत असे.

भल्या पहाटे तो पेपर टाकायला जायचा. शिवाय, दुपारी शाळा सुटली, की दुधाच्या बाटल्या पोचवायचा. त्या पैशांत त्याची फी, पुस्तके, कपडे यांचा खर्च भागे. आजीही थोडा हातभार लावत असे. मेतकूट, भाजणी, पापड असले पदार्थ करून ते ती विकी. त्यांतून त्यांना कशीबशी मीठभाकरी मिळे.

एकदा आजी खूप आजारी पडली. तिला रोजचा भातसुद्धा टाकता येईना. तिथे इतर कामे कशी झेपणार? सगळा भार तुकारामवर पडला. त्याला घराबाहेर पडणे अशक्य झाले. पहाटे पेपर टाकायलासुद्धा जाता येईना. रोजचे दूधही पोचवता येईना. शाळा सारखी बुडू लागली.

तुकाराम आजीच्या उशाशी बसून तिला गोष्टींची पुस्तके वाचून दाखवी. वाचता वाचता त्याच्या मनात येई— बसल्याबसल्या इथे असे घरी आजीजवळ काही काम करता येईल का?

एकदा तो याच विचारात गढला असता, त्याच्या हातातील पुस्तकातून एक शुभेच्छा कार्ड खाली पडले. त्याच्या मित्राने ते त्याला पुस्तकातील खुणेसाठी वापरायला दिले होते. ते पाहताच तुकारामला एकदम कल्पना सुचली—अशी भेटकार्डे तयार करून ती विकली तर...?

त्याला चित्रे काढता येत होती. त्याने आपली कल्पना आजीला सांगितली. तिलाही ती आवडली.

आजीच्या उशाशी बसल्या बसल्या तो चित्रे रंगवू लागला. सूर्योदय, झाडावरचे पक्षी, प्राणी, निरनिराळ्या रंगांची फुले अशी कितीतरी.

ही चित्रे त्याने आजीला दाखवली आणि तिची शाबासकी मिळाल्यावर तो आपल्या चित्रकला-शिक्षकांकडे धावला. त्यांनी त्याला उत्तेजन दिले, मार्गदर्शन केले आणि एवढेच नव्हे तर त्यांतले एक भेटकार्ड विकत घेऊन त्यांनी विक्रीचा शुभारंभ केला.

आजी आजारातून बरी झाली आणि तुकाराम या कामाला वेगाने लागला. नेहमीपेक्षा काही वेगळे करावे असे त्याच्या मनाने घेतले. विचार करता करता डोळ्यांसमोर अचानक एक पिंपळपान आले. पिंपळपानाचाच भेटकार्डासाठी उपयोग केला तर? असे मनात येताच त्याने वाळून जाळीदार झालेले एक पिंपळपान घेतले आणि त्यावर त्याचा कुंचला नाजूकपणे फिरू लागला. डोळ्यांपुढे घंटा आली आणि घंटेच्या आकाराची भेटकार्डे तयार झाली. अंड्याच्या आकाराचे एक कार्ड तर त्याने अशा खुबीने तयार केले, की ते उघडताच आतून पटकन एक पिवळे पिलू वर येई आणि इवलीशी चोच उघडून

'नूतन वर्षाभिनंदन' करी. कसे? ती अक्षरेच चोचीपुढे नेमकी यायची ना! एका भेटकार्डात तुकारामने मसुरीची डाळ चिकटवून सुंदर मोर तयार केला आणि दुसऱ्या एका भेटकार्डात त्याने अशी युक्ती केली, की ते सुलट असले की दाढीवाला बाबा दिसे आणि उलटे केले की जटाधारी बुवा वाटे.

आता तुकारामची भेटकार्डे भराभर विकली जाऊ लागली; पण तेवढ्याने त्याचे समाधान होत नव्हते. तो वेगवेगळ्या कल्पना लढवून अनेक सुंदर सुंदर भेटकार्डे तयार करू लागला. ती इतकी नावीन्यपूर्ण असत, की पाहताक्षणीच कुणालाही घ्यावीशी वाटत. या होणाऱ्या विक्रीमुळे त्याला अधिकच उत्तेजन मिळाले. पिंपळपानाच्या जोडीला आणखी इतर पाने आली. भेटकार्डासाठी त्यांचाही त्याने कल्पकतापूर्ण उपयोग केला. पाकिटेही मोठी छान सजवली. लहानमोठ्या रंगीबेरंगी ठिपक्यांनी तो पाकिटे सजवायचा. कधी वरून पाण्याचे थेंब पडताना तो दाखवायचा;पण खाली उगवलेले गवत मात्र खरे दिसावे म्हणून त्यांवर तो दूर्वा चिकटवायचा. कधी हिरवीगार गवताची पाती चिटकवून



फुलांच्या जागी मात्र मुलांचे हसरे चेहरे रंगवायचा. अशी विविधतेने नटलेली कितीतरी भेटकार्डे त्याने तयार केली.

दिवाळी, नाताळ, ईद अशा सणासुदीला तुकारामची ही भेटकार्डे खूप खपत. त्याच्या आजीला आनंद होई. त्याच्या या कल्पकतेमुळे तिच्या आजारापायी झालेला सगळा खर्च भरून निघाला. त्याची आजीही खडखडीत बरी झाली आणि तुकाराम नियमितपणे शाळेला जाऊ लागला. कल्पकता, चिकाटी, परिश्रम यांमुळे हे सारे घडले.

लोकांना मात्र ते त्याला मिळालेले एक वरदान वाटले!



शब्दार्थ व टिपा :

**नूतन**—नवे. **दूर्वा**—एक प्रकारचे गवत–हरळी. **वरदान**—दैवी देणगी.

**शुभेच्छा कार्ड**—वाढदिवस, दिवाळी, नाताळ, ईद इत्यादींच्या निमित्ताने शुभेच्छा व्यक्त करण्यासाठी कलात्मकरीत्या तयार केलेले पत्र.

प्रश्न व स्वाध्याय :

१. तुकारामला शिक्षण घेण्यासाठी कोणते कष्ट करावे लागत?
२. शुभेच्छा कार्ड तयार करण्याची कल्पना त्याला कशामुळे सुचली?
३. तुकारामने तयार केलेल्या शुभेच्छा कार्डांपैकी कोणत्या कार्डाची कल्पना तुम्हांला आवडली? का?
४. विचारात गढणे, शुभारंभ करणे यांचा उपयोग करून काही वाक्ये तयार करा.
५. एखाद्या शुभप्रसंगी शुभेच्छा कार्ड पाठवायचे झाल्यास तुम्ही कोणती कल्पना लढवाल? काही गमतीदार कल्पना लढवून भेटकार्डे तयार करा.

* * *

# १२ भाऊराया

********************************************************

लोकगीते लिखित स्वरूपात नसतानाही ती पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली आहेत. या लोकगीतांत स्त्रीगीते अधिक प्रमाणात आढळतात. कुटुंबातील नातीगोती, सुखदुःखे, सण-समारंभ, चालीरीती यांचे चित्रण स्त्रियांनी रचलेल्या या ओव्यांत केलेले असते. पुढील ओव्यांमध्ये बंधुप्रेमाचे दर्शन घडते.

शेताला गेली कुरी । शेत काजळाची वडी ।
माझ्या ग बंधवाची । बारा बैलांची ग जोडी ॥

पाऊस पडतो । नको वाजूगाजू ढगा ।
माझ्या ग बंधवाला । राजसाला पेरू लागा ॥

शेताआड शेत । कोण्या शेताला मी जाऊ?
बंधवाचा माझ्या । हेलकावा देतो गहू ॥

वाटेवर हरभरा । हुळा देतो मूठ मूठ ।
राजस बंधू माझा । मन याचं किती मोठं ॥



गहू-हरभऱ्याच्या गाड्या । बाई वेशीत थटल्या ।
सावळ्या बंधुजीनं । दंडाभुजांनी रेटल्या ॥
भावाघरी बैल । पवळ्या चिंतामणी ।
पाठीवर गोण्या । जोतं चढती नंदीवाणी ॥
दुरून वळखीते । तुझ्या गाडीची चकरं ।
लाडक्या बंधुराजा । बैलं न्हवं ती पाखरं ॥
दुरून वळखीते । तुझ्या गाडीची धुम्माळ ।
लाडक्या बंधुराजा । बैलं अवखळ संभाळ ॥

शब्दार्थ व टिपा :

**कुरी**—धान्य पेरण्याचे एक अवजार. **राजस**—देखणा. **हुळा**—ओल्या हरभऱ्याचे घाटे भाजून ते सोलून खातात. त्याला हुळा किंवा हावळा म्हणतात. **धुम्माळ**—गाडीच्या चाकांचा, बैलांच्या गळ्यांतल्या घुंगरांचा मिळून होणारा आवाज. **पवळ्या चिंतामणी**—बैलांची नावे. **काजळाची वडी**—सुपीक काळ्याभोर जमिनीला जणू ती काजळाची वडी असे म्हटले आहे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. आपल्या भावाचा मोठेपणा सांगण्यासाठी बहीण कोणत्या गोष्टींचा उल्लेख करते?
२. भाऊ ताकदवान आहे हे कोणत्या ओळीतून स्पष्ट होते?
३. या ओव्यांमध्ये बैलांचे कौतुक कोणत्या शब्दांत कसे केले आहे?
४. 'शेत काजळाची वडी', 'बैल न्हवं ती पाखरं', या ओळींमधल्या कल्पना तुमच्या शब्दांत अधिक स्पष्ट करा.
५. या ओव्यांमध्ये शेतकऱ्याच्या जीवनातल्या कोणकोणत्या कष्टांचा उल्लेख केलेला आहे?
६. शेतकऱ्याचे आपल्या बैलांवर फार प्रेम, ते प्रेम या ओव्यांमध्ये कोणत्या ओळींमधून दिसून येते?
७. बंधव, न्हवं, वळखीते, चकरं—हे बोलीतील शब्द आहेत. त्यांची प्रमाणभाषेतील रूपे सांगा.
८. मातीचे बैल तयार करा.

***

१३

# श्यामची आई

## सानेगुरुजी

**********************************************************************

**पांडुरंग सदाशिव साने** (जन्म: १८९९; मृत्यू: १९५०)—सानेगुरुजींनी कथा, कविता, कादंबऱ्या असे विपुल ललित लेखन केले आहे. त्याबरोबर वैचारिक लेखनही त्यांनी केलेले आहे. 'श्याम', 'धडपडणारी मुले', 'भारतीय संस्कृती', 'गोड गोष्टी', 'सुंदर पत्रे' इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

हा उतारा 'श्यामची आई' या कादंबरीतून घेतला आहे. आपल्या मुलाला चांगले वळण लागावे म्हणून श्यामच्या प्रेमळ आईलाही प्रसंगी कसे कठोर व्हावे लागले, ते स्वतः श्यामनेच इथे सांगितले आहे.

कोकणामध्ये पावसाळ्यात विहिरी तुडुंब भरलेल्या असतात. हातानंसुद्धा पाणी घेता येतं, इतक्या त्या भरतात. पावसाळ्यामध्ये पोहण्याची कोकणात मौज असते. नवीन मुलांना या वेळेसच पोहायला शिकवतात. नवशिक्याच्या कमरेला सुकडी बांधतात व देतात त्याला विहिरीत ढकलून! विहिरीत पोहणारे असतातच. माझे चुलते पट्टीचे पोहणारे होते. वडलांना पोहता येत असे. मला मात्र पोहता येत नव्हतं.

दुसरे पोहत असले म्हणजे मी मजा पाहायला जात असे. परंतु स्वतः मात्र पाण्यात कधी गेलो नाही. मला फार भीती वाटे. आमच्या शेजारची लहान लहान मुलंही धडाधड उड्या टाकत; परंतु मी मात्र भित्री भागूबाई! 'ढकला रे श्यामला' असं कोणी म्हटलं, की मी तिथून पोबारा करत असे.

माझी आई पुष्कळ वेळा म्हणे, 'अरे श्याम, पोहायला शीक. ती लहान लहान मुलं पोहतात आणि तुला रे कसली भीती?' एकदा ती म्हणाली, 'उद्या रविवार आहे. पोहायला जा.' मी काहीच बोललो नाही.

रविवार उजाडला. मी कुठंतरी लपून बसायचं ठरवलं. माळ्यावर लपून बसलो. साधारण आठ वाजायची वेळ. शेजारचे भास्कर, बन्या, वासू, बापू हे सारे आले.

"श्यामची आई, श्याम येणार आहे ना आज पोहायला?" बन्या म्हणाला.

"हो, येणार आहे; परंतु कुठं आहे तो? मला वाटलं, की तुमच्याकडंच आहे श्याम. कुठं बाहेर गेला की काय?" असं म्हणून आई मला शोधू लागली.

मी वरून सारं ऐकत होतो.

मुलं म्हणाली, "तिकडं आमच्याकडं नाही बुवा आला. कुठं लपून तर नाही बसला? आम्ही वर पाहू का, श्यामची आई?"

आई म्हणाली, "बघा बरं वर असला तर. त्याला लपून बसायची सवयच आहे. त्या दिवशी असाच माच्याखाली लपून बसला होता; पण वरती जरा जपून जा हो."

मुलं माळ्यावर येऊ लागली. आता मी सापडणार, असं वाटून भाताच्या कणगीआड मांजरासारखा लपून बसलो.

"नाही रे इथं. तो काय इथं लपून बसेल अडचणीत?" एकजण म्हणाला.

"चला आपण जाऊ, उशीर होईल."

इतक्यात भास्कर म्हणाला, "अरे, तो बघा! त्या कणगीपाठीमागं लपलाय."

झालं, ती मुलं जवळ येऊन मला ओढू लागली; परंतु किती झाली तरी ती परक्यांची मुलं. ती जोर थोडाच करणार! ती हळूहळू ओढत होती व मी सर्व जोर लावून प्रतिकार करत होतो.

"श्यामची आई, तो काही येत नाही आणि हालतही नाही," मुलं म्हणाली.

आईला राग आला. ती म्हणाली, "बघू दे, कसा येत नाही तो!" असं म्हणून आई वर आली व रागानं माझा हात धरून तिनं मला ओढलं. ती मला फरफटत ओढू लागली, तरी मी हटून बसतच होतो. एका हातानं आई ओढत होती. दुसऱ्या हातानं ती शिपटीनं मला मारत होती. आई मुलांना म्हणाली, "तुम्ही हात धरा नि ओढा. मी पाठीमागून हाकलते व झोडपते चांगला! बघू कसा येत नाही तो!"

मुलं मला ओढू लागली व आई शिपटीवर शिपटी देऊ लागली. मी ओरडू लागलो, "नको ग आई मारू! आई आई, मेलो!"

"काही मरत नाहीस. ऊठ, तू उठून चालू लाग. आज मी सोडणार नाही तुला. त्या मुली आल्या बघ, तुझी फजिती बघायला!" असं म्हणून आईनं जोरानं मारणं चालवलं.

"जातो मी. नको मारू," मी म्हटलं.

"नीघ तर. पुन्हा पळालास तर बघ, घरात घेणार नाही."

"सोडा रे त्याचा हात. तो येईल हो. श्याम, अरे, भिऊ नकोस. एकदा उडी मारलीस म्हणजे तुझा धीर आपोआपच चेपेल. मग आम्ही नको म्हटलं, तरी तू आपण होऊन उड्या मारशील. रडू नकोस." बन्या म्हणाला.

देवधरांच्या विहिरीवर वरवडेकरांचा बाळू व इतर तरुण होतेच. "आज आला का श्याम? ये रे. मी सुकडी नीट बांधतो हो," असं म्हणून बाळू वरवडेकरानं माझ्या कमरेला सुकडी बांधल्या. विहिरीत खाली दोनचारजण चांगले पोहणारे होते. मी थरथर कापत होतो. "हं, मार बघू आता उडी," बाळू म्हणाला.

मी आत डोकवी, पुन्हा मागं येई; पुढं होई, पुन्हा मागं होई; नाक धरी, पुन्हा सोडी— असं चाललं होतं.

"भित्रा रे भित्रा! वेणू, तू मार उडी म्हणजे श्याम मग उडी मारील," वेणूचा भाऊ म्हणाला. वेणूनं परकराचा काचा मारून उडी मारली. इतक्यात एकदम मला कुणीतरी आत लोटून दिलं.

मी ओरडलो, "मेलो, आई ग मेलो!"

मी घाबरलो, पाण्यातील मंडळींच्या गळ्याला मी मिठी मारू लागलो. ते मिठी मारू देईनात.

"आडवा हो असा. पोट पाण्याला लाव व लांब हो. हात हालव," असे मला पोहण्याचे धडे मिळू लागले.

बाळूनंही उडी घेतली व त्यानं मला धरलं. माझ्या पोटाखाली हात धरून तो मला शिकवू लागला, "घाबरू नको. घाबरलं म्हणजे लौकर दम लागतो."

"आता फिरून उडी मार. चढ वर." बन्या म्हणाला. मी पायऱ्या चढून वर आलो, नाक धरून पुढं-मागं करत होतो, परंतु शेवटी टाकली एकदाची उडी!

''शाबास रे श्याम! आता आलंच पोहणं. भीती गेली की सारं आलं,'' बाळू म्हणाला. त्यानं मला पाण्यात धरलं व आणखी शिकवलं.

''आता आणखी एक उडी मार म्हणजे पुरे,'' सारी मुले म्हणाली.

वर येऊन मी उडी टाकली. एकटाच थोडा पोहलो. माझ्या कमरेला सुकडी होत्या म्हणून बुडण्याची भीती नव्हती. माझा धीर चेपला. पाण्याची भीती गेली. आम्ही सारे घरी जाण्यास निघालो. मुलं माझ्याबरोबर मला पोचवायला आली.

बन्या म्हणाला, ''श्यामच्या आई, श्यामनं आपण होऊन शेवटी उडी मारली. मुळीच भ्यायला नाही  आणि बरं का, सुकडीवर थोडं थोडं त्याला पोहताही येऊ लागलं.''

''अरे, पाण्यात पडल्याशिवाय भीती जात नाही. श्याम, डोकं चांगलं पूस,'' आई म्हणाली.

मुलं निघून गेली. मी डोकं पुसलं. मी जरा फुरंगटून बसलो होतो. इतक्यात 'श्याऽम' अशी आईनं गोड हाक मारली. मी आईजवळ गेलो व म्हटलं, ''काय?''



आई म्हणाली, "ती दह्याची कोंढी घे. त्यात दही आहे. चाटून टाक. तुला आवडतं ना?"

"मला नको जा, सकाळी मार मार मारलंस! आणि आता दही देतेस?" मी रडवेला होऊन म्हटलं.

आईचे डोळे भरून आले होते. माझं बोलणं आईला लागलं का, असं मनात आलं. आईनं तेलाची वाटी आणली व माझ्या वळांना ती तेल लावू लागली. मी काही बोललो नाही. आई रडवेली होऊन म्हणाली, "श्याम, तू भित्रा आहेस असं का जगानं तुला म्हणावं? माझ्या श्यामला कुणी नावं ठेवू नयेत. 'तुमचा मुलगा भित्रा आहे' असं तुझ्या आईला कुणी म्हटलं, तर ते तुला आवडेल का? ते तुला खपेल का?"

शब्दार्थ व टिपा :

**सुकड**—वाळून सुकलेला असोला नारळ. **पट्टीचे**—तरबेज. **माचा**—काथ्याचे विणलेले बाजले; खाटले. **माळा**—पोटमाडी, छपराजवळची ठेंगणी जागा. **कणगा, कणगी**—धान्य साठवण्यासाठी जमिनीवर तट्ट्या उभारून त्याला बाहेरील बाजूने कळकांचा आधार देऊन तयार केलेले साधन. **शिपटी**—बारीक ओली छडी; फोक. **कोंढी**—दही विरजण्याचे लहान मडके.

**पोबारा करणे**—पळून जाणे. **धीर चेपणे**—भीती मोडणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. श्यामला आईने का मारले?

२. श्यामला वाटणारी पाण्याची भीती कशी गेली?

३. श्यामच्या आईचे डोळे का भरून आले?

४. श्यामला आई शेवटी काय म्हणाली?

५. (अ) 'मार मार मारणे' म्हणजे खूप मारणे. खालील क्रियापदांचा असाच उपयोग करून वाक्ये तयार करा:
राबणे, फिरणे, बोलणे.

(आ) 'ती जोर थोडाच करणार!' म्हणजे ती जोर करू शकत नव्हती. 'थोडाच' या शब्दाचा या अर्थाने उपयोग करून अशी आणखी काही वाक्ये तयार करा.

***

# १४ प्राणिस्वातंत्र्याचा विजय असो!

## सुधाकर प्रभू

*************************************************************

**सुधाकर बाळकृष्ण प्रभू** (जन्म: १९३०)—यांनी मुलांसाठी कथा, कादंबऱ्या, नाटिका असे पुष्कळ लेखन केले आहे. 'कोणार्कचा कलाकार', 'मोहनिया' इत्यादी त्यांच्या कादंबऱ्या आहेत. 'मुली नाटक करतात', 'अमरवेल' इत्यादी नाटिका त्यांनी लिहिल्या आहेत.

पुढील नाटिका 'मुली नाटक करतात' या पुस्तकातून घेतली आहे. माणसाप्रमाणे प्राण्यांनाही भावभावना असतात असे मानून त्यांच्या सुखदुःखांचे चित्रण या नाटिकेत केले आहे.

.............................................................

(जंगलातील एक घर. घराच्या डाव्या-उजव्या अंगाला दरवाजे. पडदा उघडतो. बैठकीच्या खोलीतल्या आरामखुर्चीवर बसलेला मोती कुत्रा. तो बराच वेळ झोपेत असावा. भला मोठा आळस देऊन तो खुर्चीवर नीट सावरून बसतो. एवढ्यात बाहेरून एक गाढव डोकावते. मोती एकदम उठून उभा राहतो.)

मोती: (स्वगत) बापरे! आले वाटतं या घराचे मालक. न विचारता मी असा इथं आल्याबद्दल ते नक्कीच रागावतील; पण मी तरी काय करू? सकाळीच मालकानं पाठीत लाकूड घालून मला हुसकलं. मी म्हातारा झालो ना! काल कुठं कोल्हयानं एक कोंबडं पळवलं तर मालकीण म्हणाली, 'हात मेल्या! बघावं तेव्हा पसरलेला...' म्हणे, 'खायला काळ आणि भुईला भार!' मालकानं बसल्या जागेवरूनच एक लाकूड भिरकावलं. तिथून केकाटत पळत सुटलो तो थेट इथं. जरा आराम करावा म्हटलं,तर (जांभई देत) ही स्वारी हजर! (गाढव परत डोकावते हे पाहून) या मालकाला मी चोरबीर तर नाही ना वाटलो? त्यासाठीच असा दबा धरून पाहतोय वाटतं. आधीच पेकाट मोडलेलं. आता शंभर वर्षं भरलीच म्हणायची!

गाढव: (पुन्हा डोकावत) आत येऊ का?

मोती: (भांबावून) अं... अं... या... या ना आत.

गाढव: (आत येत) मघापासून म्हणतोय—तुम्हांला विचारावं की नको. मी जरा बसू का या खुर्चीवर?

मोती: अहो, त्यात काय विचारायचं? या या, बसा ना.

गाढव: नाही... म्हणजे आपल्याला अडचण होत असेल तर...

मोती: छे छे! कसली आलीय अडचण? मी आपला अंगाची गुंडाळी करून इथं कोपऱ्यात पडेन.

गाढव: (आरामखुर्चीवरून उठत) छ्या छ्या! असं कसं? मालकानं कोपऱ्यात झोपायचं आणि पाहुण्यानं...

मोती: मी...मी मालक? छे, छे, नक्कीच काही तरी घोटाळा झालाय. अहो, मला अजून दोन घटकादेखील झाल्या नाहीत इथं येऊन. मघाशी जोराचा वारा-पाऊस आला. दार उघडं दिसलं अन् घुसलो झालं आत. एक डुलकी होते न होते तो दत्त म्हणून तुम्ही इथं!

गाढव: मी आपला तुम्हांलाच मालक समजलो. (मोत्याचे कण्हणे ऐकून) काय हो? काय झालं एकदम?

मोती: काही नाही... काही नाही. जरा कळ आली पाठीत.

गाढव: पण कळ यायला असं काय झालं?

मोती: काय झालं हे काय सांगू! अहो, सकाळी सकाळी मी पाठीत लाकूड बसल्यानं केकाटत बाहेर पडलो. जन्मभर केलेल्या आमच्या सेवेचं हे बक्षीस! आता पुन्हा म्हणून त्या घरात पाऊल टाकणार नाही.

गाढव: काय योगायोग! अगदी तुझ्यासारखीच माझी कथा आहे. मलादेखील आज मालकानं असंच बदड बदड बदडलं. मी जो सटकलो तो हा इथं!

मोती: हे सगळे मालक म्हणजे एकजात दुष्ट! निर्दय! जन्मभर त्यांची सेवाचाकरी करा आणि शेवटी असं देशोधडीला लागा. बस्स,

आजपासून आपण मित्र. पण काय रे, तुला का बदडलं मालकानं?

गाढव: आता का! कहाणीच आहे ती. तुला म्हातारपणामुळं हाकललं, तर मला माझ्या स्वामिनिष्ठेचं हे असं फळ मिळालं!

मोती: काय म्हणतोस काय? आश्चर्यच आहे!

गाढव: काल रात्री आमच्या मालकाच्या घरी चोर आले. दारात बसलेल्या वाघ्या कुत्र्याला मी म्हटलं, 'अरे, चोर दिसतात. भुंकून मालकाला जागं कर.' तर वाघ्या म्हणतो कसा, 'जाऊ दे रे. आजकाल मालक माझ्याकडं मुळीच लक्ष देत नाही. तो मला खायला घालत नाही. मी मुळीच भुंकणार नाही.'

मोती: अस्सं? मग काय झालं?

गाढव: मी मनात म्हटलं, हे काही चांगलं नाही. खाल्ल्या मिठाला आपण जागलं पाहिजे. मी आपली ओरडायला सुरुवात केली. त्याबरोबर चोर गेले पळून; पण एवढ्यात मालक बाहेर आला.

मोती: मग त्यानं तुला शाबासकी दिली असेल?

गाढव: अरे, कसली शाबासकी! वाघ्या गप्प झोपलाय आणि मी ओरडतोय, हे बघताच त्यानं काठी घेऊन मला चांगलं बेदम मारलं.

मोती: काय म्हणतोस काय!

गाढव: मग काय सांगतो तर? माझाच मूर्खपणा मला नडला. माझ्या स्वामिनिष्ठेचं मला हे असं बक्षीस मिळालं!

मोती: वा रे मालक! या मालकशाहीचा धिक्कार असो! वॉव! वॉव! वॉव!

गाढव: खरंच, आपलंच चुकलं. आम्ही इतकं माणसाळायलाच नको होतं मुळी. आम्ही माणसाळलो आणि फसलो.

मोती: खरंच फसलो. रानातल्या इतर प्राण्यांप्रमाणंच स्वतंत्र राहायचं सोडून आम्ही माणसाची सेवाचाकरी करू लागलो आणि इथंच सगळं चुकलं.

गाढव: मग ही चूक आपण वेळेवरच सुधारू या. आता परत म्हणून त्या

माणसाचं आणि त्याच्या घराचं नाव नको!

मोती : ठरलं तर मग...

(एवढ्यात ओसरीवर म्याँऽऽव म्याँऽऽव असा रडण्याचा आवाज. थोड्याच वेळात रुमालाने आपले डोळे पुसत मनीताई प्रवेश करतात.) कोण? मनीताई? या या या.

गाढव : पण असे डोळे पुसायला झालं तरी काय मनीताई?

मनीताई : म्हणे, मी म्हातारी झाले! मला उंदीर पकडता येत नाहीत.

गाढव : कोण म्हणतो असं?

मनीताई : कोण आणि काय! खुद्द आमचे मालक म्हणताहेत. छे बाई! असली मतलबी जात पाहिली नव्हती कधी. या म्हातारपणी कसले दिवस आले बघा मला! कोण बघणार माझ्याकडं?

मोती : मनीताई, तू काळजी करू नको. आम्हीदेखील असेच मालकाचा धिक्कार करून पडलो आहोत घराबाहेर.

मनीताई : सगळे मालक अस्सेच! मग मी तुमच्याबरोबर राहू तर?

मोती : खुशाल रहा तू आमच्याबरोबर.

मनीताई : कुठं, इथंच ना? तुमचंच ना हे घर?

मोती : घराचं म्हणतेस? घर काही आमचं नाही. हे बघ मनीताई, आपल्याला राहायला घरच कशाला पाहिजे? कुठंही झाडाखाली राहू आपण; पण परत म्हणून मालकाकडं जायचं नाही. आजपासून आपण स्वतंत्र.

मनीताई : हे सगळं खरं, पण आपल्या पोटापाण्याचं काय? इतके दिवस मालक आपल्याला खायला घालत होता.

गाढव : खोट्टं! माझ्या मालकानं तर मला कधीही खाऊ म्हणून घातलं नाही. नेहमी राब राब राबवायचा आणि शेवटी चरायला उकिरड्यावर सोडून द्यायचा.

मनीताई : ते जाऊ द्या. आधी आपल्या पोटापाण्याचा उद्योग काहीतरी पाहिला पाहिजे.

मोती: खरं आहे मनीताई. यापुढं आपण काहीतरी स्वतंत्र उद्योग करू या.

मनीताई: तेच म्हणतेय मी. पण आपण उद्योग तरी काय करायचा?

गाढव: सुचलं. सुचलं...असं केलं तर?

सगळे: कसं? कसं?

गाढव: असं करू—आपण एक कंपनी काढू या.

सगळे: कसली कंपनी?

गाढव: आपण करमणुकीचे कार्यक्रम करू या. गाण्याचे कार्यक्रम करू आपण. नाहीतरी माझा पहाडी आवाज आहेच!

मनीताई: वा! छानच होईल कार्यक्रम.

मोती: काय म्हणता? आपण गाणार आणि आपण गाण्याचे कार्यक्रम करायचे?

मनीताई: म्याँव म्याँव म्याँव! करणार म्हणजे काय? करायचेच. आपल्या सगळ्यांच्या आवाजांत किती विविधता आहे? होय की नाही रे मोती?

मोती: तर तर! भूः भूः भूः...

गाढव: बरोबर. हॉ हॉ हॉऽऽ!

मनीताई: काय तान मारलीस! म्याँव म्याँव म्याँव!...

गाढव: मनीताई, तू स्त्री असल्यामुळं तुझा आवाज मुळातच किनरा आणि गोड. या मोत्याचाही आवाज काही वाईट नाही म्हणा आणि माझा आवाज म्हणाल तर... आता (किंचित हसून) माझ्या आवाजाबद्दल मीच काय सांगायचं?

(एवढ्यात कोंबडा तुरा उभारून ऐटीत येतो.)

कोंबडा: कुकूऽऽच कूऽऽ कुकूऽऽच कूऽऽ! मित्रांनो, मी आत येऊ? (आत येतो. त्याचा रुबाब बघून सगळेजण अदबीने उभे राहतात. तोच या झोपडीचा मालक आहे अशा समजुतीने त्याला अभिवादन करतात.)

कोंबडा: अरे, अरे, तुम्ही असे उभे का? बसा, बसा.

मनीताई: आपणच या झोपडीचे मालक ना?

कोंबडा: मी? काय वेडे आहात काय? कुकूऽऽच कूऽऽ कुकूऽऽ च कूऽऽ. माझ्या मालकीचं या जगात काही म्हणता काही नाही. आजच मला माझ्या म्हाताऱ्या मालकिणीनं टोपलीखालून काढलं आणि घराबाहेर फेकून दिलं.

गाढव: पण तुला घरातून हाकलून द्यायला कारण तरी काय झालं? तू तर तसा म्हाताराही दिसत नाहीस.

कोंबडा: ती एक गंमतच झाली.

मोती: गंमत? सांग तरी.

कोंबडा: ऐका मंडळी. माझी मालकीण होती एक म्हातारी. माझ्यावर तिचा फार विश्वास. असा विश्वास, की तिला वाटायचं, मी आरवतोय म्हणूनच सूर्य उगवतोय. कशावरून तरी काल रात्री गावकऱ्यांशी झालं तिचं कडाक्याचं भांडण. म्हातारी त्यांना म्हणाली, 'आहात कुठं! माझा कोंबडा आरवला नाही तर सूर्यदेखील उगवायचा नाही. त्याला टोपलीखाली झाकून ठेवते. पाहते कसा सूर्य उगवतो!'

मनीताई: मग काय झालं सकाळी?

कोंबडा: अहो, काय होणार? सूर्य काय कुणासाठी उगवायचा राहतो? तो आपला नेहमीसारखा उगवला. म्हातारीची झाली फजिती. गावकरी अंगणात जमले. म्हातारीची थट्टा करायला लागले. म्हातारी कातावली. तरातरा टोपलीकडं धावली. खसकन मला टोपलीखालून ओढलं आणि दिलं भिर्रकन भिरकावून. मी आपला क्वॅक क्वॅक करत जीव घेऊन पळत सुटलो.

गाढव: पहा पहा! इथून तिथून मालक सगळे एकाच माळेचे मणी! आजपासून आपण या गुलामगिरीतून मुक्त होऊ या.

मोती: ठीक आहे. मग मी ठराव मांडतो. मालकाच्या कचाट्यातूंन प्राण्यांची सुटका करण्याकरता प्राणिस्वातंत्र्य संस्था स्थापन करू या.

मनीताई: म्यॉंव म्यॉंव म्यॉंव! या ठरावाला माझा टेकू आहे.



गाढव: झालं तर मग. आपला ठराव एकमतानं पास झाला.

मोती: टाळ्या वाजवल्याशिवाय का कुठला ठराव पास होतो? वाजवा टाळ्या. (सगळे टाळ्या वाजवतात.)

कोंबडा: घोषणा दिल्याशिवाय जगाला कसं कळेल? कुकूऽऽच कूऽऽ कुकूऽऽच कूऽऽ ! प्राणिस्वातंत्र्याचा विजय असो!

सर्व: (एकदम) प्राणिस्वातंत्र्याचा विजय असो!



शब्दार्थ व टिपा :

**स्वामिनिष्ठा**—आपल्या धन्याविषयी इमान. **मतलबी**—स्वार्थी. **कातावणे**—वैतागणे.

**शंभर वर्षे भरणे**—मरणाची घटका जवळ येणे; ज्यातून सुटका नाही असे संकट येणे. **देशोधडीला लागणे**—आप्तस्वकीय सोडण्याची पाळी येणे. **खाल्ल्या मिठाला जागणे**—जाणीव ठेवणे. उपकारांची जाणीव बाळगणे. **टेकू देणे**—पाठिंबा देणे. **एकाच माळेचे मणी**—एकाच प्रकारच्या व्यक्ती; सारख्या स्वभावाची माणसे. **खायला काळ आणि भुईला भार**—काही न काम करता नुसता खाऊन बसणारा— ऐतखाऊ.

प्रश्न व स्वाध्याय :

१. मालकाने मोतीला का हाकलून दिले?
२. 'माझ्या स्वामिनिष्ठेचं हे असं फळ मिळालं!' असे गाढव का म्हणाले?
३. मनीताईला का हाकलून दिले होते?
४. रानात जमलेल्या साऱ्या प्राण्यांनी कोणता उद्योग सुरू करावा असे ठरवले?
५. लोकांनी म्हातारीची थट्टा का केली?
६. सर्वांनी मिळून कोणती घोषणा केली?
७. (अ) मोती, मनीताई, गाढव, कोंबडा या सगळ्यांच्या आवाजात भिन्नता आहे. पाच-पाच मुलांचे गट करा आणि कुणी कोंबडा होऊन तर कुणी मोती होऊन ते ते आवाज वर्गात काढून दाखवा.
(आ) यांशिवाय इतर प्राण्यांचे आवाज त्यांच्या उच्चारांनुसार लिहून काढा.

***

## १५ निर्झरास

**बालकवी**

**************************************************

**त्र्यंबक बापूजी ठोमरे** (जन्म: १८९०; मृत्यू: १९१८)—अगदी लहानपणापासूनच हे कविता लिहू लागले. १९०७ साली जळगाव येथे भरलेल्या साहित्य संमेलनात 'बालकवी' ही उपाधी त्यांना मिळाली. त्यानंतर त्याच नावाने ते प्रसिद्धीस आले. 'बालकवींची कविता' या त्यांच्या संग्रहात त्यांच्या कविता एकत्र केल्या आहेत.

बालकवींना झरा हा एखादया अवखळ बालकासारखा वाटतो. अशाच एका झऱ्याकडे पाहून त्यांना किती मनोरम कल्पना सुचल्या, ते पुढील कवितेत वाचा.

गिरिशिखरे वनमालाही
दरी दरी घुमवित येई
कड्यांवरुनि घेऊन उड्या
खेळ लतावलयी फुगड्या
घे लोळण खडकावरती,
फिर गरगर अंगाभवती,
जा हळुहळु वळसे घेत
लपत छपत हिरवाळीत.
पाचूंची हिरवी राने
झुलव गडे, झुळझुळ गाने



वसंतमंडप—वनराई
आंब्याची पुढती येई.
श्रमलासी खेळुनि खेळ
नीज सुखे क्षणभर बाळ.
ही पुढची पिवळी शेते
सळसळती-गाती गीते.
झोप कोठुनी तुला तरी?
हास लाडक्या नाच करी.
बालझरा तू बालगुणी,
बाल्यचि रे भरिसी भुवनी





आकाशामधुनी जाती,
मेघांच्या सुंदर पंक्ती,
इंद्रधनूची कमान ती
ती संध्या खुलते वरती,
रम्य तारका लुकलुकती
नीलारुण फलकावरती,
शुभ्र चंद्रिका नाच करी
स्वर्गधरेवर एकपरी.
ही दिव्ये येती तुजला
रात्रंदिन भेटायाला

वेधुनि त्यांच्या तेजाने
विसरुनिया अवघी भाने,
धुंद हृदय तव परोपरी
मग उसळी लहरीलहरी,
त्या लहरींमधुनी झरती
दिव्य तुझ्या संगीततती,
नवल न, त्या प्राशायाला
स्वर्गहि जर भूवर आला
गंधर्वा! तव गायन रे,
वेड लाविना कुणा बरे?

### शब्दार्थ व टिपा :

**गिरिशिखर**—पर्वताचा माथा. **वनमाला**—अरण्यांची रांग. **लतावलय**—वेलींचे जाळे. **भुवन**—जग; घर. **पंक्ती**—रांग. **चंद्रिका**—चांदणे. **दिव्ये**—लोकोत्तर, स्वर्गीय अशा सुंदर सुंदर गोष्टी. **तती**—रांग.

**प्राशन करणे**—पिणे.

**वसंतमंडप**—मोहोरलेली आमराई हाच वसंत ऋतूतील मंडप.

### प्रश्न व स्वाध्याय :

१. निर्झर कोठून कोठून वाहत येतो?
२. कोणकोणते खेळ खेळून झरा दमतो?
३. निर्झराला 'बालगुणी' असे कवीने का म्हटले आहे?
४. निर्झराला रात्रंदिवस कोण कोण भेटायला येते? त्यांना 'दिव्य' असे का म्हटले आहे?
५. 'झुळझुळ', 'सळसळ' हे नाद सुचवणारे शब्द आहेत. असेच आणखी काही शब्द सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
६. 'हिरवी राने' यात हिरव्या रंगाचा उल्लेख आहे. पिवळा, पांढरा, निळा हे रंग कवीने कोणत्या वस्तूंसाठी योजलेले आहेत?
७. 'इंद्रधनूची कमान' यासारखे डोळ्यांपुढे चित्र उभे करणारे आणखी काही शब्दसमूह कवितेतून शोधा व त्यांतील तुम्हांला आवडणारी कल्पना तुमच्या भाषेत लिहून काढा.

***



१६

# नाना शंकरशेट — मुंबईचे एक शिल्पकार

य. दि. फडके

******************************************************

**यशवंत दिनकर फडके** (जन्मः १९३१)—केशवराव जेधे, र. धों. कर्वे व सेनापती बापट यांची चरित्रे यांनी लिहिलेली आहेत. याशिवाय राजकीय व सामाजिक विषयांवर लेखन केले आहे.

आज जी मुंबई दिसते तिची जडणघडण अनेक थोर व्यक्तींमुळे झाली. त्यांपैकी जगन्नाथ शंकरशेट मुरकुटे ऊर्फ नाना शंकरशेट हे प्रमुख होत. त्यांचा परिचय या पाठात करून दिला आहे.

.................................................................................................

मुंबई ही महाराष्ट्राची राजधानी आहे. बोटांवर मोजण्याइतक्या जगातील थोड्या महानगरांमध्ये तिची गणना होते. कारखाने-गिरण्या, व्यापार-उद्योग, दळणवळण, वाहतूक याबाबतींत हे शहर आघाडीवर आहे, तसेच ते शिक्षण, कला, क्रीडा आदी सांस्कृतिक क्षेत्रांतही अग्रगण्य आहे. अनेक अंगांनी

विकसित व संपन्न असलेल्या या शहराच्या जडणघडणीत नाना शंकरशेट यांनी फार मोठा वाटा उचलला आहे. यामुळेच ते मुंबईचे एक प्रमुख शिल्पकार म्हणून ओळखले जातात. आपल्या देशात आज बऱ्याच सामाजिक, राजकीय, आर्थिक सुधारणा झालेल्या दिसतात. तसेच वैचारिक चळवळीही चाललेल्या आढळतात. मुंबई ही या साऱ्यांची गंगोत्री आहे. या मुंबईतच एकोणिसाव्या शतकात अनेक प्रकारच्या सुधारणा व प्रगती यांची बीजे प्रथम पेरली गेली. त्यामुळे मुंबई शहराला एक आगळे महत्त्व प्राप्त झाले आहे. त्यांपैकी बऱ्याच सुधारणा घडवून आणण्यात नाना शंकरशेट यांचा फार मोठा वाटा आहे.

नानांचा जन्म दहा फेब्रुवारी अठराशे तीन रोजी एका धनाढ्य व्यापारी कुटुंबात झाला. त्यांचे संपूर्ण नाव जगन्नाथ शंकर मुरकुटे असले तरी 'नाना शंकरशेट' या नावाने ते प्रसिद्ध आहेत. नानांचे वडील वारले तेव्हा नाना जेमतेम वीस वर्षांचे होते. आपला संसार व घरचा पिढीजात व्यापारधंदा सांभाळण्याची मोठी जबाबदारी त्यांच्या अंगावर पडली. तरीसुद्धा ते मुळीच डगमगले नाहीत.

त्या वेळचे राज्यपाल माउंट स्टुअर्ट एलफिन्स्टन यांना आधुनिक शिक्षणाबद्दल फार आस्था होती. लोकांनी शिक्षण घ्यावे, वेगवेगळ्या क्षेत्रांत प्रगती करावी, जीवन अनेक अंगांनी समृद्ध करावे, असे त्यांना फार वाटे.

त्यासाठी त्यांनी पाठ्यपुस्तके छापण्यास सुरुवात केली. हुशार विद्यार्थ्यांना उत्तेजन देण्यासाठी ते बक्षिसे देत. चांगल्या पुस्तकांच्या लेखकांना पारितोषिके देण्याचा उपक्रमही त्यांनीच प्रथम सुरू केला.

एलफिन्स्टनची ही कामगिरी पाहून नानांच्या मनात त्यांच्याविषयी आदरभाव निर्माण झाला. त्यामुळे नानांनी जेव्हा विद्यालय व महाविद्यालय यांची स्थापना केली तेव्हा त्यांनी एलफिन्स्टनचे नाव त्यांना दिले.

आजच्या मानाने त्या काळात मुलींच्या शिक्षणात अनंत अडचणी होत्या. गोरगरिबांना शिक्षण घेणे तर फारच अवघड होते. या अडचणी लक्षात घेऊन नानांनी स्वतःचा पैसा खर्च करून मुलींसाठी व गोरगरिबांसाठी शाळा सुरू

केल्या आणि एकापरीने शिक्षणाची कवाडे सर्वांसाठी खुली केली. या उपक्रमांना त्यांच्या काही स्नेह्यांचीही साथ मिळाली. त्यांमध्ये आचार्य बाळशास्त्री जांभेकर, जमशेटजी जीजीभाई, फ्रामजी कावसजी आदींचे सहकार्य त्यांना लाभले.

अठराशे पंचेचाळीस साली पहिले वैद्यकीय महाविद्यालय मुंबईला निघाले, ते त्यांच्याच प्रयत्नांमुळे. या महाविद्यालयाला त्यांनी व त्यांच्या मित्रांनी त्या वेळचे राज्यपाल ग्रँट यांचे नाव दिले. त्यानंतर दहा वर्षांनी कायद्याचे प्रशिक्षण देण्याचा पहिला वर्ग सुरू झाला तोही नानांच्याच प्रयत्नांनी. मुंबई विद्यापीठाची स्थापना अठराशे सत्तावन्न साली झाली. अगदी प्रारंभापासूनच विद्यापीठाच्या कारभाराशी त्यांचा जवळचा संबंध होता. शिक्षण चांगल्या रीतीने दिले व घेतले जाण्यासाठी मातृभाषा हेच माध्यम असले पाहिजे, या विचाराशी ते सहमत होते.

नानांचे कार्यक्षेत्र शिक्षणापुरतेच मर्यादित राहिले नाही, तर प्रगत जीवनासाठी दळणवळण व वाहतूक यांची अतिशय आवश्यकता आहे, हे ओळखून त्या क्षेत्रांकडेही त्यांनी लक्ष दिले. सोळा एप्रिल अठराशे त्रेपन्न रोजी मुंबई ते ठाणे या मार्गावर भारतातील पहिली आगगाडी धावली. रेल्वेचा कारभार पाहणाऱ्या संचालक मंडळाचे नाना एक सभासद होते. एवढेच नव्हे तर या कंपनीचे कार्यालयही नानांच्या ठाकूरद्वार येथील वाड्यात होते.

आज मुंबईकरांना आगगाडीचे मुळीच नवल वाटत नाही; पण शंभर-सव्वाशे वर्षांपूर्वीच्या त्या काळात मात्र आगगाडीचे लोकांना इतके नवल वाटले, की ते म्हणत, 'साहेबाचा पोऱ्या कसा अकली! बिनबैलाने गाडी रे हाकली!'

मुंबई शहर हे भारतातील एक आघाडीचे औद्योगिक केंद्र आहे. कापडगिरण्यांसाठी मुंबई प्रसिद्ध आहे. बँकांचे महत्त्व लक्षात घेऊन मर्कन्टाईल बँक स्थापन करण्यात नानांनी पुढाकार घेतला. मुंबईला पाणी पुरवणाऱ्या 'विहार' तलावाची योजना त्यांनी तडीस नेली. मुंबईचे रस्ते गॅसच्या दिव्यांनी उजळून निघाले तेही नानांच्या परिश्रमांमुळेच. वाढत्या मुंबईचा विचार



करून तिथल्या सार्वजनिक जीवनास रोगराईचा धोका पोचू नये, ते निरोगी राहावे म्हणून ते सतत प्रयत्नशील राहिले.

हे सारे करत असताना त्यांनी मुंबईच्या सौंदर्याकडेही दुर्लक्ष केले नाही. मुंबई शहरामध्ये त्यांनी अनेक ठिकाणी बागा व उद्याने तयार केली. लोकांसाठी ती खुली ठेवली. त्यांत तऱ्हेतऱ्हेची फुलझाडे लावून त्या बागांच्या रूपाने मुंबई शहराच्या सौंदर्यात त्यांनी भर घातली. त्यासाठी त्यांनी सढळ हाताने देणग्या दिल्या. मुंबईच्या कलाजीवनाचेही त्यांनी संगोपन केले. बाळंतीण स्त्रियांची होणारी आबाळ आणि गैरसोई लक्षात घेऊन त्यांनी

सुसज्ज प्रसूतिगृह सुरू केले. शिवाय दुष्काळासारख्या नैसर्गिक आपत्तींच्या काळात लोकांच्या अडचणी निवारण्यासाठी दुष्काळनिवारण-निधीसारखी कल्पना पुढे मांडून त्यांनी लोकांना मदत केली.

आपल्या देशातील लोकांची सर्वांगीण प्रगती व्हावी अशी नानांना तळमळ होती. काही अनिष्ट चाली व रूढी यांच्याविरुद्ध नाना ठामपणे उभे राहिले. सतीसारख्या अमानुष व दुष्ट चालींच्या उच्चाटनासाठी त्यांनी राज्यकर्त्यांना मदत केली. मुंबई इलाख्याच्या कायदेमंडळाचे ते एक सभासद होते. लोकांची गाऱ्हाणी राज्यकर्त्यांसमोर निर्भयपणे मांडून ते अन्यायाची दाद लावून घेत. अठराशे सत्तावन्न साली इंग्रजी राजवट उखडून टाकण्यासाठी जो उठाव झाला, त्यात नानांचा हात असावा असा राज्यकर्त्यांना संशय वाटत होता. नानांना त्यापायी बराच त्रास सहन करावा लागला.

विद्वत्तेबद्दल त्यांना पराकोटीचा आदर असल्यामुळे त्यांनी विद्वानांचा नेहमीच आदरसत्कार केला. मुंबईची व पर्यायाने देशाची चिंता वाहणारे नाना एकतीस जुलै अठराशे पासष्ट रोजी कालवश झाले.

शालान्त परीक्षेत संस्कृत विषयात पहिला व दुसरा क्रमांक पटकावणाऱ्या हुशार विद्यार्थ्यांना 'जगन्नाथ शंकरशेट' या नावे शिष्यवृत्ती देण्यास अठराशे सहासष्टपासून सुरुवात झाली. ही शिष्यवृत्ती मिळवणे हा बहुमान समजला जातो आणि ती मिळवण्यासाठी हुशार विद्यार्थ्यांमध्ये कमालीची चढाओढ चालते.

नाना आज आपल्यात नसले तरी त्यांच्या कर्तृत्वाची साक्ष देणाऱ्या अनेक संस्था मुंबईत आजही पाहायला मिळतात. तुम्ही मुंबईतच राहत असाल किंवा मुंबईला गेलात तर एलफिन्स्टन महाविद्यालय, जे. जे. इस्पितळ, ग्रँट वैद्यकीय महाविद्यालय, टाऊनहॉल एशियाटिक सोसायटीचे ग्रंथालय, राणीचा बाग इत्यादी महत्त्वाची स्थळे अवश्य बघा आणि टाऊनहॉलमधील नानांचा पुतळाही पाहायला विसरू नका.

'मरावे परी कीर्तिरूपे उरावे' या वचनाचे साक्षात उदाहरण म्हणजे नानांचे जीवन!

## शब्दार्थ व टिपा :

**अग्रगण्य**—आघाडीचे. **शिल्पकार**—मूर्ती घडवणारा; आकार देणारा. **धनाढ्य**—खूप श्रीमंत. **पिढीजात**—पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेला. **कवाड**—दार. **प्रगत**—पुढारलेले. **इलाखा**—विशिष्ट सत्तेखालचा विशिष्ट मुलूख. **टाऊनहॉल**—सभा, परिषदा इत्यादींसाठी बांधलेली शहरातील प्रशस्त इमारत.

**तडीस नेणे**—एखादी गोष्ट पूर्ण करणे. **सढळ हाताने**—दिलदारपणे. **कालवश होणे**—मरण पावणे.

**मरावे परी कीर्तिरूपे उरावे**—(रामदासांच्या श्लोकातील एक ओळ) आपल्या भलेपणाच्या आठवणी मागे राहतील असे काही चांगले कार्य आयुष्यात करावे.

**गंगोत्री**—गंगा नदीच्या उगमाची जागा. त्यावरून एखाद्या गोष्टीच्या प्रारंभाचे ठिकाण, उगमस्थान.

## प्रश्न व स्वाध्याय :

१. मुंबईला एक आगळे महत्त्व कोणत्या गोष्टींमुळे प्राप्त झाले आहे?
२. आपल्या शैक्षणिक संस्थांना नानांनी कोणाचे नाव दिले? का?
३. त्यांनी शिक्षणाची कवाडे सर्वांसाठी खुली केली, असे का म्हटले आहे?
४. मुंबई शहराच्या सौंदर्यात कोणत्या रूपांनी नानांनी भर घातली?
५. नानांनी कोणकोणती लोकोपयोगी कामे केली?
६. नानांच्या कर्तृत्वाची साक्ष देणाऱ्या कोणत्या संस्था आजही मुंबईत आहेत?
७. (अ) व्यापारधंदा, दळणवळण असे काही जोडशब्द या पाठात आले आहेत. असेच आणखी काही शब्द सांगा व त्यांचा वाक्यांत उपयोग करून ती लिहा.
(आ) 'उद्योग' या शब्दाला 'इक' हा प्रत्यय लागून 'औद्योगिक' असा शब्द झाला. या पाठात असे आणखी काही शब्द आले आहेत. उदाहरणार्थ—'सांस्कृतिक'. पाठातील असे शब्द शोधा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

***

## १७ आम्ही हवे आहोत का?

शांता ज. शेळके

**शांता जनार्दन शेळके** (जन्मः १९२२)—कविता, चित्रपटगीते, ललित लेख, बालवाङ्मय असे अनेक प्रकारचे लेखन यांनी केले आहे. 'वर्षा', 'गोंदण' हे काव्यसंग्रह. 'तोच चंद्रमा' हा गीतांचा संग्रह. 'चिमणचारा', 'टिपटिप चांदणी' इत्यादी बालगीतसंग्रह.

हा लेख 'आनंदाचे झाड' या ललितलेखसंग्रहातून घेतला आहे. माणसांची इस्पितळे आपण नेहमीच पाहतो; पण जनावरांसाठीही इस्पितळे असतात हे तुम्हांला ठाऊक आहे काय? अशाच एका इस्पितळातला हा फेरफटका. सर्वच प्राणी माणसाच्या मायेसाठी किती भुकेले असतात हे या पाठावरून तुम्हांला कळेल.



मुंबईच्या परळ भागात एक इस्पितळ आहे. ते आहे जनावरांचं इस्पितळ. ते आतून बघायचं असं माझ्या मनात खूप दिवसांपासून होतं. एकदा तो योग आला. कमानीच्या आत तर सहज प्रवेश मिळाला. उजवीकडं एक छोटीशी

इमारत दिसते. हे बहुधा कार्यालय असावं. कार्यालयाच्या दाराशीच भिंतीवर एक मोठी तसबीर आहे. त्या तसबिरीत बैल, घोडा, कुत्रा, मांजर, शेळी अशी वेगवेगळ्या जनावरांची चित्रं आहेत. खाली एक छोटंसं पण मनाला भिडणारं वाक्य आहे,—'आम्हांला तुमची गरज आहे; तुम्हांला आम्ही हवे आहोत का?'

माणसाच्या दयाबुद्धीला, करुणेला मुक्या प्राण्यांनी केलेलं ते आवाहन मला आत कुठंतरी हालवून सोडतं. आता मी कार्यालयात पाऊल टाकते. समोरच्या कपाटावर उदी रंगाचा एक गलेलठ्ठ बोका मजेत आपल्या मिशा साफ करत बसला आहे. मला बघताच तो कपाटावरून उडी मारतो आणि साहेबांच्या टेबलावर येऊन बसतो.

इस्पितळ बघण्यासाठी मी आले आहे, असं मी त्या साहेबांना सांगते. बोक्याचं डोकं कुरवाळत ते माझं म्हणणं ऐकून घेतात आणि लगेच मला परवानगी देऊन टाकतात. इतकंच नाही, तर मला सारं इस्पितळ नीट दाखवण्यासाठी भरत नावाचा एक छोटा चुणचुणीत मुलगाही ते माझ्याबरोबर देतात.

आम्ही पुढं जाऊन डावीकडं वळतो. एवढ्यात भरत मला म्हणतो, "बाई, हा मांजरांचा विभाग बघायचाय?"

मांजरांचा विभाग म्हटल्यावर मी उत्सुकतेनं आत पाऊल टाकते. एक लहानशी पण स्वच्छ खोली. आपल्या स्वयंपाकघरातले ओटे जेवढ्या उंचीचे असतात तेवढ्या उंचीचे कट्टे आणि त्यांच्याखाली एकेरी जाळीने विभागलेले छोटे छोटे खण. बाहेरच्या बाजूनंही या खणांना जाळ्या बसवलेल्या आहेत. प्रत्येक खोलीत एक एक पेशंट आहे.

एक भलाथोरला काळाभोर बोका आपल्या हिरव्या डोळ्यांनी व्याकूळ नजरेनं बघत आहे. एक चिमुकलं कबरं पिलू कावरंबावरं झालं आहे. एक मांजरी चिडलेल्या वाघिणीसारखी पिंजऱ्यात इकडूनतिकडं फेऱ्या मारत आहे. एक ठिपक्याठिपक्यांचं मांजर आपण पेशंट आहोत हे विसरून मार्जारजातीच्या स्वच्छतेच्या आवडीनुसार आपल्या पंजानं तोंड, मिशा, डोळे पुसून साफ करत आहे. एक मांजर खूपच आजारी असावं. कारण ते डोळे मिटून पुढल्या दोन

पंजांवर तोंड ठेवून गप पडलं आहे. प्रत्येक मांजराजवळ दोन बशा आहेत—एक खाद्यपदार्थासाठी व दुसरी पाण्याची. प्रत्येकाजवळ त्याच्या प्रकृतीतले चढउतार दाखवणारा तक्ता भिंतीवर लावला आहे. प्रत्येकाला बसायला मऊ अंथरूण आहे.

मी आणि भरत खोलीत पाऊल टाकतो मात्र, सारी मांजरं चमकतात. त्यांच्या डोळ्यांत आतुरता काठोकाठ भरली आहे. काही मांजरं जाळीवर नाक घासू लागतात. काही नखांनी जाळ्या खरवडू लागतात. 'मियाँव, मियाँव, मियाँव', कोवळ्या, निबर, भरीव, किनऱ्या आवाजांचा एकच कलकलाट सुरू होतो. प्रत्येक मांजर आपापल्या परीनं माझं लक्ष वेधून घेण्याचा प्रयत्न करत आहे. प्रत्येकजण जणू म्हणत आहे, 'मला इथं फार एकटं वाटतंय. जरा माझ्याकडं या हो. मला कुरवाळा.'

मी जाळीच्या छिद्रांतून बोटं घालून कुणाचं डोकं खाजवते, कुणाचा गळा खाजवते तर कुणाचे कान कुरवाळते. मांजरं खूश होतात. पोटांतून 'गुर्रगुर्र' आवाज काढून समाधानाची पावती देतात.

आता माझं लक्ष एका गोष्टीकडं जातं. प्रत्येक मांजराच्या कप्प्यामध्ये त्याचं नाव लिहिलेलं आहे—'जॅक जाधव', 'बकुल गोखले', 'सॅमी डिकुन्हा', 'रोमल टिपणीस'.

जाधव, गोखले, डिकुन्हा, टिपणीस! माझ्या ध्यानात येतं, ही आहेत मांजरांना दिलेली त्यांच्या मालकांची आडनावं!

त्या जाधव, गोखले, टिपणीस इत्यादी मंडळींचा डोळ्यांनी निरोप घेऊन मी बाहेर पडते. मला निरोप देताना पुन्हा एकदा 'मियाँव' चा गजर होतो. भेटीला आलेला माणूस परत जायला निघाला म्हणजे इस्पितळाच्या पेशंटच्या चेहऱ्यांवर जी खिन्नता दिसते, तीच या मांजरांच्या चेहऱ्यांवर मला दिसली. घरी लाड करून घ्यायची सवय झालेल्या या मांजरांना इथं विलक्षण एकटं एकटं वाटत असलं पाहिजे.

"या मांजरांना औषधपाणी अगदी माणसांसारखं करतात का रे?" मी भरतला विचारलं.

"तर तर!" असं म्हणून भरत सांगतो, "त्यांचं खाणंपिणं पथ्याचं असतं, बाई." एकदम भरतला काहीतरी आठवतं. तो मला म्हणतो, "बाई, शेजारी कुत्र्यांचा विभाग आहे, तिथं जाऊ या जरा."



आम्ही शेजारच्या विभागात जातो. बघते, तर खरंच एक भली दांडगी अतिशय देखणी कुत्री तिथं निजलेली दिसली. जवळच एका टोपलीत तिची बरीच पिलं आहेत. अजून डोळेही न उघडलेल्या त्या पिलांच्या अंगांवरून मी हलकेच बोटं फिरवते. त्यांची आई तपकिरी रंगाची आहे; पण पिलं पांढरी. काही ठिपक्याठिपक्यांची आहेत. सावरीच्या कापसाचे जणू मऊमऊ गोळेच! इवले कान, इवल्या शेपट्या, लालसर ओली नाकं आणि पोटांतून येणारा 'कुई कुई' आवाज. कितीतरी वेळ मी त्यांच्याकडं बघतच राहिले.

तिथून पुढं गेल्यावर कुत्र्यांचा आणखी एक विभाग लागला. इथं तऱ्हेतऱ्हेची कुत्री आहेत. लठ्ठ आणि रोड. चिडकी आणि शांत. साखळीला सारखे हिसके देऊन काही सुटू बघण्याचा प्रयत्न करणारी, तर काही स्वस्थ बसून राहिलेली.

एका कुत्र्याच्या कानामागं मोठं गळू झालं आहे. एकाचा मोडलेला पाय प्लॅस्टरमध्ये घालून ठेवला आहे. एक कुत्रा चिडून माझ्या अंगावर झेप घेऊ बघतो. मी दचकून मागं सरकते. भरत त्याच्यावर खेकसतो, "झेन्या, चूप! असं नाही करायचं. आपल्या पाहुण्या आहेत त्या. चूप!"

झेन्या जणू समजल्यासारखा चूप बसतो.

दुसरा एक कुत्रा सारखा झेप घेऊ लागतो; पण तो अंगावर तुटून पडण्यासाठी नव्हे. तो पुढचे दोन्ही पंजे जुळवून मला नमस्कार करतो. झेन्या रागीट, तर हा एकदम सालस. भरत मला म्हणतो, "आल्या-गेल्या सर्व लोकांना तो असा नमस्कार करतो बाई."

मी भरतला विचारते, "इथं आणखी कोणते प्राणी येतात रे?"

"पुष्कळ येतात बाई," भरत सांगू लागतो, "शेळ्या येतात. मेंढ्या, ससे येतात. माकडं येतात."

आम्ही बोलतो आहोत, एवढ्यात माझ्या पायांजवळून एक मांजरी चाललेली दिसते. भरत मला म्हणतो, "हात लावा बाई तिला."

मी तिच्या पाठीवर हात ठेवते. मांजरीचं सर्वांग शहारतं. मग ती सावरते. माझ्याजवळ येते. मी तिला थोपटते, तशी ती प्रेमानं 'गुर्रगुर्र' करू लागते. मी

भरतला विचारते, "ही अशी दचकली कशी रे?"

भरत सांगतो, "जन्मापासून आंधळी आहे ती! तुमचा अनोळखी हात म्हणून घाबरली. इथंच जन्मलेलं हे पोर. जन्मापासून ठार आंधळं. डोळे बघाल तर अगदी लख्ख आहेत; पण दिसत मात्र नाही हं. आम्ही हे पिलू पाळलं. आता मोठी मांजरी झाली आहे. इथं ती सगळ्यांना ओळखते. विश्वासानं वावरते. आम्ही तिला बाहेर सोडत नाही. तिथं बिचारीचा कुठं निभाव लागेल?"

हे सारं पाहून मी बाहेर आले. एक वेगळंच जग पाहिलं असं वाटलं! का कुणास ठाऊक, आत शिरताना जे वाक्य वाचलं होतं, ते पुन्हा पुन्हा डोळ्यांपुढं येत होतं—'आम्हांला तुमची गरज आहे; तुम्हांला आम्ही हवे आहोत का?'

शब्दार्थ व टिपा :

**करुणा**—दया. **आवाहन करणे**—योग्य तो प्रतिसाद मिळण्यासाठी सुचवणे, उद्युक्त करणे, विनंती करणे. **उदी**—तपकिरी. **कबरा**—ठिपक्याठिपक्यांचा; चित्रविचित्र रंगाचा. **मार्जार**—मांजर. **किनरा** (आवाज)—बारीक व उंच (आवाज). **सालस**—स्वभावाने नम्र, विनयशील.

**हालवून सोडणे**—अस्वस्थ करणे. **कावरेबावरे होणे**—गोंधळून जाणे. **अंगावर तुटून पडणे**—जोराचा हल्ला करणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. लेखिकेने इस्पितळातल्या तसबिरीखाली कोणते वाक्य वाचले? त्या वाक्यातून काय सुचवले आहे?
२. प्रत्येक मांजर आपल्याला काय म्हणत आहे, असे लेखिकेला वाटले?
३. कुत्र्यांचे कोणकोणते स्वभावविशेष लेखिकेला जाणवले?
४. 'एक वेगळंच जग पाहिलं,' असे लेखिका का म्हणते?
५. या पाठातला तुमच्या मनाला भिडलेला एक प्रसंग सांगा.
६. गलेलठ्ठ, कुरवाळणे, कलकलाट, इस्पितळ व पेशंट या शब्दांना त्याच अर्थाचे शब्द सुचवा.
७. तुम्हांला आवडणाऱ्या एखाद्या पाळीव प्राण्याचे दहा-बारा ओळींत वर्णन लिहा.

***

## १८ सैनिकी रक्त

### लक्ष्मीकांत तांबोळी

****************************************************************

**लक्ष्मीकांत सखाराम तांबोळी** (जन्म: १९३९)—कथालेखक, कवी, कादंबरीकार. 'हुंकार', 'अस्वस्थ सूर्यास्त' हे त्यांचे कवितासंग्रह. 'दूर गेलेले घर', 'कृष्णकमळ' या त्यांच्या कादंबऱ्या.

पुढील कथा 'तवंग' या कथासंग्रहातून घेतली आहे. शंकरराव हे तरुणपणी रणांगणावर शौर्य गाजवलेले एक झुंजार सैनिक. म्हातारपणी ते आजाराने अंथरूण धरतात. आपण असे घरातच मरणार की काय या कल्पनेने त्यांचे सैनिकी मन तळमळू लागते. इतक्यात एक अशी घटना घडते, की त्यामुळे शंकरराव आनंदाने बेहोष होतात. ती घटना कोणती हे या कथेत वाचा.

.................................................................

गेल्या दोन महिन्यांपासून शंकरराव आजारी होते. दिवसेंदिवस आजार वाढतच होता. डॉक्टर प्रकृती तपासून जात होते. रोगाचे निदान काही केल्या होत नव्हते. घरातील माणसे चिंताक्रांत होती. कुणाला काही सुचत नव्हते. कुठलाच उपाय उरला नव्हता. रात्री-अपरात्री छातीतून अशी कांही चमक निघे, की वाटे, आता संपले सारे!

गेल्या दोन महिन्यांपासून हे असेच चालले होते. ओळखीचे अनेक लोक येत नि भेटून जात. शंकररावांकडे पाहिले, की पाहणाऱ्याला फार वाईट वाटे. एवढा मोठा पहाडासारखा माणूस;पण या आजाराने पार खचला होता, खंगला होता. तरीही ते कमालीच्या जिद्दीने मृत्यूशी झुंजत होते.

झुंजणे हा त्यांच्या रक्ताचा गुणच होता. साध्या सैनिकापासून चढत चढत ते मेजर झाले होते. दुसऱ्या महायुद्धात त्यांनी आपल्या पराक्रमाची शर्थ केली. प्रसंगी अन्नावाचून दिवस काढले; पण शेवटपर्यंत झुंजत राहिले. बहुमानाची कितीतरी पदके त्यांनी मिळवली होती. शत्रूच्या गोळीची निशाणी अजूनही त्यांच्या उजव्या दंडावर कायम होती. बोलताना त्या जखमेचा ते मोठ्या अभिमानाने उल्लेख करत. अर्धे आयुष्य रणांगणावर आणि मृत्यूशी झुंजण्यात

घालवलेल्या शंकररावांना उत्तरकाळात कष्टाचे फळ मिळाले. अवघे आयुष्य वैभवाने उजळून निघाले. दोन्ही मुले कर्तबगार निघाली. थोरला डॉक्टर नि धाकटा फ्लाइट-लेफ्टनंट. सगळे कसे मनासारखे झाले होते; पण आपण आजारी पडून आपल्याला मृत्यू येणार याचेच त्यांना दुःख वाटत होते. मृत्यू यावा तर तो रणांगणावर; शत्रूशी सामना देत असताना—बंदुका, तोफा, रणगाडे यांच्या भडिमारात! पण आता मृत्यू त्यांना भेडसावत होता. अगदी सामान्य माणसासारखे मरायचे म्हणजे काय!

वडील आजारी असल्याची तार आली म्हणून भारतीय विमानदलात असलेला त्यांचा धाकटा मुलगा सुरेंद्र लगेच रजा घेऊन भेटायला आला. तो आला नि शंकररावांना कमालीचा आनंद झाला. त्यांची प्रकृतीदेखील थोडीशी सुधारली. प्रत्येक घरातील एकतरी जवान सैन्यात असला पाहिजे अशी त्यांची इच्छा. म्हणून त्यांना सुरेंद्राचा अभिमान वाटत होता. सुरेंद्र आपल्यासारखाच पराक्रमी होऊन नाव काढील याची त्यांना खात्री होती. तो आल्यापासून त्याच्याशी बोलण्यातच त्यांचा वेळ जाई. त्यात त्यांना स्वतःच्या आजारपणाचा विसर पडे. आयुष्यात केलेल्या पराक्रमाच्या कथा सांगताना ते बेभान होत.

मनाने पुन्हा एकदा शंकरराव पूर्वीचे जीवन जगू लागले. आठ-पंधरा दिवसांतच शंकररावांची प्रकृती सुधारली. सर्वांचे चेहरे उजळले. घरातील सर्वांच्या अंगात एक नवा उत्साह संचारला.

आणि एके दिवशी युद्ध-आघाडीवर तातडीने रुजू होण्याबद्दलची तार घरी आली. सुरेंद्राची दोन महिन्यांची रजा रद्द करण्यात आली होती. तार आलेली कळताच शंकरराव कधी नाही ते बिछान्यावर एकदम उठून बसले. त्यांच्या अंगात एवढे बळ कुठून आले याचेच सर्वांना नवल वाटले.

"बेटा सुरेंद्र," शंकररावांनी मोठ्या खुशीत हाक मारली.

सुरेंद्र जड पावलांनी त्यांच्या जवळ आला. घरातले वातावरण एकदम पालटले. सर्वांचे चेहरे पुन्हा चिंताग्रस्त बनले. आनंद वाटला होता तो फक्त शंकररावांना. सुरेंद्र जड पावलांनी येतो आहे हे पाहताच ते रोखून बघत गरजले, "असा भेदरटासारखा काय दिसतोस? भीती वाटते युद्धाची?"

"तसं नाही दादा, पण तुम्ही आजारी असताना..." त्याला पुढे बोलवले नाही.

"तिकडं देश संकटात सापडलाय नि तुला माझी काळजी वाटते? तू सैनिक आहेस हे लक्षात ठेव. सैनिकाला नातंगोतं काही नसतं. त्याचं नातं असतं फक्त देशाशी, रणांगणाशी! आजच दुपारच्या गाडीनं नीघ. माझी काळजी करू नकोस. मी काय, आज आहे, उद्या नाही आणि खरं सांगतो—आता मी बरा होणार. खात्रीनं सुधारणार. जा, तयारीला लाग."

शंकरराव ताडकन उठून उभे राहिले. हे पाहून सर्वांना आणखी धक्का बसला. आता जर त्यांना कुणी पाहिले असते, तर ते आजारी होते हे कुणालाही खरे वाटले नसते. कुठलीतरी एक अद्‌भुत शक्ती त्यांच्या अंगात संचरली होती.

गेल्या दोन महिन्यांपासून त्यांची गाडी गॅरेजमध्ये तशीच पडून होती. उत्साहाच्या भरात त्यांनी ती बाहेर काढायला सांगितली आणि ते ड्रायव्हरला म्हणाले, "धाकट्या साहेबांना स्टेशनवर पोचवायचंय, तू शेजारी बैस. आज मी गाडी चालवणार!"

सुरेंद्राला स्टेशनवर पोचवून शंकरराव घरी आले. घरात येताच त्यांनी फर्मान सोडले, "आज मटन, मुर्गी, बिर्यानी सब कुछ बनाव. हम खूब खायेंगे!"

कधी नाही ते त्या दिवशी शंकरराव मनसोक्त जेवले.



दिवसांमागून दिवस जात होते. शंकररावांची प्रकृती झपाट्याने सुधारत होती. गाडी घेऊन रोज फिरायला जाणे, नातवंडांना खेळवणे आणि रेडिओवर युद्धाच्या बातम्या ऐकणे असा त्यांचा कार्यक्रम ठरून गेला. प्रत्येक दिवस नव्या नव्या वार्ता घेऊन येऊ लागला. वर्तमानपत्रांतील रकानेच्या रकाने आपल्या जवानांनी केलेल्या पराक्रमांच्या बातम्यांनी भरू लागले. रेडिओवर बातम्या ऐकताना शंकररावांचे हात शिवशिवत. कधी कधी तर शंकरराव इतके अनावर होत, की नकळत त्यांच्या तोंडातून 'शाब्बास! लढो प्यारे! जीते रहो!' असे उद्‌गार बाहेर पडत. युद्‌ध, बाँब, रणगाडे, गोळ्या, हल्ला हेच शब्द त्यांच्या बोलण्यात सारखे असत. जणू रणचंडिकाच त्यांच्या अंगात संचरली होती!

शत्रूचा धुव्वा उडवत आपले जवान एक एक ठाणे जिंकत आगेकूच करत होते आणि शंकरराव एकेका दिवसाने तरुण होत होते!

शब्दार्थ व टिपा :

**निदान**—रोगाची परीक्षा. **चिंताक्रांत**—काळजीने ग्रासलेला. **शर्थ**—प्रयत्नांची पराकाष्ठा. **निशाणी**—खूण, चिन्ह. **उत्तरकाळ**—नंतरचा काळ; उतारवय. **रणचंडिका**—युद्‌धाची देवता. **आगेकूच**—विजय मिळवत पुढे जाणे.

**हात शिवशिवणे**—स्फुरण येणे; काही करण्याची जबर इच्छा होणे. **धुव्वा उडवणे**—नाश करणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. शंकररावांना खरे दुःख कोणते होते?
२. आपल्या आजारपणाचा त्यांना केव्हा विसर पडे?
३. शंकरराव बिछान्यावर एकदम का उठून बसले?
४. ते सुरेंद्रावर का रागावले? त्यांनी कोणती आज्ञा केली?
५. शंकरावांची प्रकृती कशामुळे सुधारू लागली?
६. 'पहाडासारखा माणूस' याप्रमाणे हिमालय, वाघ, समुद्र, आभाळ या शब्दांचा वापर करून वाक्ये तयार करा.
७. काही समरगीते मिळवून ती पाठ करा.



# थवे

बा. भ. बोरकर

********************************************************

**बाळकृष्ण भगवंत बोरकर** (जन्म: १९१०; मृत्यू: १९८४) — 'दूधसागर', 'आनंदभैरवी', 'गितार', 'कांचनसंध्या' असे यांचे अनेक कवितासंग्रह आहेत. त्यांनी इतर ललितलेखनही केले आहे. बोरकरांच्या कवितेत गोमंतकातील निसर्गाच्या रंगरूपांची देखणी शब्दचित्रे सर्वत्र विखुरलेली आहेत.

'थवे' ही कविता 'चैत्रपुनव' या कवितासंग्रहातून घेतली आहे. फुलपाखरांचे थवे बघताना त्यांच्या पंखांच्या मोहक हालचाली, त्यांवरचे चित्रविचित्र रंग कवीच्या मनाला कशी भुरळ घालतात ते पहा.

.......................................................................

बोला कुणा कुणा हवे फूलपाखरांचे थवे
जादूगार श्रावणाच्या कर्णकुंडलींचे दिवे
निळे, जांभळे, तांबडे, जर्द पिवळे, हिरवे,
काळे, पांढरे, राखेरी, भुरे, पोपटी, पारवे,
कोणी उन्हेरी, चंदेरी, कोणी अंजिरी, शेंदरी,
मोरपिसांपरी कोणी वर्ख ल्यालेले भर्जरी,
कुणी मखमली, मल्मली, कुणी वर्गंदी, वायली,
किनखापी मुलायम, कुणी शीतल सायली,
कुणा अंगी वेलबुट्टी, चित्रचातुरी गोमटी,
इंद्रधनूचेही वर्ण होती पाहून हिंपुटी.
वर्णलाघवाचे थवे जाती घेत हेलकावे,
कधी थांबून पुसती फुलापानांची आसवे,
कधी पिकलेल्या साळी, कधी साळकांची तळी,
कधी लालगुंज रस्ता जाती लंघून मंडळी,

त्यांच्या लावण्याने दुणा येथे श्रावणाचा हर्ष,
अशा मोसमी गोव्यात खरेच या एक वर्ष
पण धरायाचा त्यांना फक्त करावा बहाणा,
सुखे बघत रहावा सप्तरंगांचा तराणा.



## शब्दार्थ व टिपा :

**राखेरी**—राखेच्या रंगाचे. **उन्हेरी**—उन्हाच्या सोनेरी रंगाचे. **वर्ख**—मुलामा. **मल्मली**—मलमलीसारखे मऊ, तलम. **वर्गंदी**—ऑर्गंडी या वस्त्रासारखे. **वायली**—'वायल' नावाच्या वस्त्रासारखे पातळ. **किनखाप**—सोनेरी किंवा चंदेरी भरतकाम केलेले उंची रेशमी वस्त्र. **सायली**—एक नाजूक, पांढरे सुगंधी फूल. **चित्रचातुरी गोमटी**—चित्रांची सुंदर कलाकुसर. **हिंपुटी**—कष्टी; हिरमुसलेले. **वर्णलाघव**—रंगांचे सौंदर्य. **साळ्क**—कमळ (हा कोकणी शब्द आहे.) **लंघून**—ओलांडून. **दुणा**—दुप्पट. **मोसम**—ऋतू; हंगाम. **बहाणा**—सोंग. **तराणा**—स्वरांचा मेळ.

**श्रावणाच्या कर्णकुंडलीचे दिवे**—श्रावणात सृष्टिसौंदर्य भरपूर आढळते. श्रावण त्या सौंदर्याने नटलेला असतो. उडणारी रंगीबेरंगी फुलपाखरे म्हणजे श्रावणाने आपल्या कानांत घातलेल्या कुंडलांतील हालणारे, रंग बदलणारे दिवेच.

**पुसती फुलापानांची आसवे**—फुलापानांवर पडलेले पावसाचे थेंब कवीला त्यांनी ढाळलेल्या अश्रूसारखे वाटतात. फुलापानांवर बागडताना फुलपाखरे जणू मायेने त्यांचे अश्रूच पुसतात अशी कवीने कल्पना केली आहे.

**सप्तरंगांचा तराणा**—इंद्रधनुष्य सात रंगांचे आणि संगीतही सात सुरांचे. रंग आणि नाद यांचा कवीने इथे सुंदर मिलाफ केला आहे. फुलपाखरांचे रंग बघताना कवीला सुंदर संगीत ऐकल्याचाही जणू भास होतो.

## प्रश्न व स्वाध्याय :

१. फुलपाखरांचे विविध रंग कोणते?
२. फुलपाखरांच्या पंखांचा स्पर्श कवीला कोणकोणत्या गोष्टींची आठवण करून देतो?
३. फुलपाखरे कुठे कुठे उडतात? काय काय करतात?
४. कवीने श्रावणाला जादूगार का म्हटले आहे? त्याचा हर्ष कशामुळे वाढतो?
५. 'वर्णलाघवाचे थवे जाती घेत हेलकावे',
'कधी लालगुंज रस्ता जाती लंघून मंडळी'—
या ओळींतील सौंदर्य समजावून घ्या.

***



# एक ऐतिहासिक क्षण

तेनसिंग नोर्गे

*************************************************************

**तेनसिंग नोर्गे** (जन्मः १९१४; मृत्यूः १९८६) – एव्हरेस्ट हे जगातले सर्वोच्च शिखर जिंकणारा एक विजयी वीर म्हणून तेनसिंग नोर्गे जगप्रसिद्ध आहेत. त्यांना बालपणापासूनच गिर्यारोहणाची आवड होती. त्यांनी इंग्रजीत आत्मचरित्र लिहिले असून त्याचा मराठी अनुवाद प्रसिद्ध झाला आहे.

'एव्हरेस्टच्या कुशीत मी' या आत्मचरित्रातून पुढील उतारा घेतला आहे. मानवजातीच्या इतिहासातला एक अविस्मरणीय क्षण असे एव्हरेस्ट-विजयाचे चित्तथरारक शब्दचित्र लेखकाने इथे रेखाटले आहे.

.............................................................

अठ्ठावीस मे १९५३! बरोबर एक वर्षापूर्वी याच दिवशी मी एव्हरेस्टचं शिखर सर करण्याचा प्रयत्न केलां होता. पुन्हा आज याच दिवशी एक वर्षानंतर आम्ही तोच प्रयत्न करत होतो.

एक शेरपा, हिलरी, ग्रेगरी, लो आणि मी असे आम्ही पाचजण होतो. सकाळी नऊ वाजता दोन तुकड्या करून आम्ही चढाईला सुरवात केली. प्रत्येकी सुमारे पंचवीस किलो वजनाचे सामान पाठीवर घेऊन आम्ही चाललो होतो.

आमच्यापुढं गेलेल्या लो व ग्रेगरी यांच्या तुकडीनं बर्फाच्छादित खडकांवर कुऱ्हाडीनं पायऱ्या खोदून ठेवल्या होत्या. त्यामुळं आम्हांला वर चढताना त्रास कमी होत होता. दुपारच्या सुमारास आम्ही पहिल्या तुकडीला गाठलं. एका उंच कड्याशी आम्ही पोचलो. कड्याचा चढ अधिकच लागत होता. त्यामुळं आमची गती मंदावली होती. पायांखालचा बर्फाचा थर अधिकच टणक जाणवत होता. आम्ही फार थकून गेलो. कुठंतरी विश्रांतीसाठी थांबावं असं आम्ही ठरवलं.

एका ठिकाणी थांबलो. आता आम्ही सुमारे नऊ हजार मीटर उंचीवर आलो

होतो. लो, ग्रेगरी व शेरपा यांनी इथं आमचा निरोप घेतला आणि ते खाली परतले. आता मी व हिलरी दोघंच उरलो.

काळोख पडू लागला तेव्हा आम्ही रात्रीच्या मुक्कामासाठी जागा शोधू लागलो. एका ठिकाणी मोठ्या मुश्किलीनं तंबू ठोकला. सुदैवानं वारा फार सोसाट्याचा नव्हता. आम्ही रांगत रांगत तंबूत शिरलो. आमच्याजवळचा छोटासा स्टोव्ह पेटवला आणि गरम कॉफी व लिंबाच्या भुकटीचं गरम सरबत बनवलं. आम्हांला भयंकर तहान लागली होती. आम्ही गटागटा सरबत व कॉफी प्यालो. रात्री नीट झोप लागली नाही. काहीशा झोपेत आणि जागेपणात रात्र काढली. बाहेर निवांत वातावरण होतं. वारा मुळीच नव्हता.

एकोणतीस मे उजाडली. याच दिवशी एक वर्षापूर्वी लॅंबर्ट व मी पराभव पत्करून एव्हरेस्टवरून परतलो होतो याची मला आठवण झाली.

पहाटे साडेतीन वाजता आम्ही अंथरुणावरून उठलो. स्टोव्ह पेटवला. कॉफीसाठी व सरबतासाठी बर्फ वितळवून पाणी केलं.

मी तंबूच्या बाहेर पाहिलं, तो आकाश निरभ्र व शांत होतं. अजूनही वारा वाहू लागला नव्हता.

आम्ही पुढील प्रवासासाठी सिद्ध झालो; पण हिलरीचे बूट बर्फानं पार आच्छादून गेले होते. रात्री त्यानं ते उशाशी ठेवले होते त्यामुळं त्यांवर बर्फ दाटलं होतं. पेटत्या स्टोव्हवर ते बराच वेळ धरले तेव्हा कुठं त्यांच्यावरचं बर्फ वितळलं.

सकाळी साडेसहा वाजता आम्ही तंबूबाहेर पडलो. आकाश अजूनही स्वच्छ होतं. वारा वाहत नव्हता. एकावर एक असे तीन हातमोजे आम्ही हातांत घातले. बुटाच्या तळाला तीक्ष्ण खिळे असलेलं पोलादी आवरण चढवलं. पाठीवर जवळजवळ अठरा-एकोणीस किलो वजनाचं ऑक्सिजनचं सिलेंडर घेतलं. हातात बर्फ खोदण्याचा टिकाव होता. त्याभोवती चार निशाणं घट्ट बांधलेली होती. जाकिटाच्या खिशात लाल-निळी पेन्सिल होती.

"चला, झाली सारी तयारी," असं म्हणून चालू लागलो.

हिलरीच्या बुटांचा टणकपणा अजून गेला नव्हता आणि त्याचे पायही थंडीनं गारठलेले होते; म्हणून मी पुढं झालो. माझ्या हातातल्या दोरखंडाला पकडून तो माझ्यामागून चढत होता. पर्वतरांगेच्या वरील टोकावरून आम्ही एव्हरेस्टच्या दक्षिण शिखराच्या दिशेनं पुढं जात होतो. एक वर्षापूर्वी लँबर्ट व मी इथपर्यंत पोचलो होतो. त्या वेळी हवा कितीतरी थंड होती. आज मात्र स्वच्छ चकचकीत ऊन पडलं होतं. हिलरीचे बूट आता नरम झाले होते. त्यामुळं तो आता पुढं झाला व मी मागं पडलो. आळीपाळीनं आम्ही मागंपुढं होत होतो.

एव्हरेस्टच्या दक्षिण शिखराच्या टोकावर एकोणतीस मेच्या सकाळी नऊ वाजता आम्ही पोचलो. दहा मिनिटं आम्ही तिथं थांबलो. तिथून शंभर-एक मीटर पर्वतरांगेचा कडा चढून गेल्यावर आम्ही एव्हरेस्टच्या मुख्य शिखरावर पोचणार होतो; पण हे पुढचं शंभर मीटर चढणंच अवघड होतं. कडा एकदम अरुंद आणि सरळ उभा होता. उजव्या किंवा डाव्या बाजूला किंचित जरी तोल गेला असता तरी कपाळमोक्षच झाला असता.

आम्ही दक्षिण शिखरावरून प्रथम थोडं खाली उतरून नंतर मुख्य शिखराच्या दिशेनं वर चढू लागलो. पायाखालचं बर्फ घसरण्याचं सतत भय वाटत होतं. हवा अजूनतरी छान होती. आम्ही थकलो नव्हतो; परंतु श्वासोच्छ्वास घ्यायला मात्र दोघांनाही त्रास होत होता.

हळूहळू, थांबत थांबत, आम्ही तो कडा ओलांडून पार करत होतो. प्रत्यक्ष मुख्य शिखरमाथ्यावर पोचण्याच्या मार्गात आता फक्त एकच अडथळा उरला होता. खडकाचा एक उंच सुळका आमच्या वाटेत उभा होता. तो ओलांडून किंवा त्याला वळसा घालून गेलो, की आम्ही शिखरावर पोचणार होतो. सुळक्याच्या आणि आमच्यामध्ये आता फक्त एक अति अरुंद व चढ असलेली बिकट वाट होती. हिलरी सावधपणं पुढं झाला. अतिशय काळजीपूर्वक तोल सावरत, बेतानं त्या उंचवट्यावर चढला.

मोठ्या प्रयासानं आम्ही तो सुळका पार केला व सुटकेचा श्वास टाकून मागं पाहिलं.

मी वर नजर टाकली. आता शिखर अगदी जवळ आलं होतं. यश समोर दिसत होतं. हृदय धडधडू लागलं. आम्ही आणखी वर चढू लागलो. वाटेत अजूनही मोठमोठ्या हिमराशी होत्या. त्या एकामागून एक ओलांडून आम्ही वर, अधिक वर चढत होतो. बस्स! आता फक्त एक हिमराशी वाटेत होती. तिथं क्षणभर थांबलो. हिलरी व मी एका दोरखंडाला धरून वर चढू लागलो. हिलरी पुढं आणि मी त्याच्या मागं सावधपणं आणि सावकाश शिखराच्या दिशेनं वर जात होतो आणि आमच्या आयुष्यात एक महान क्षण आला! अखेर आम्ही एव्हरेस्ट सर केलं! त्या शिखरावर पोचलो. हिलरी प्रथम आणि मी लगेच त्याच्या पाठोपाठ!

अपयशानं खचून न जाता अखेर सातव्या खेपेस एव्हरेस्टवर पोचण्यात मी यशस्वी झालो!

आम्ही सभोवार नजर टाकली. मेलरी व आयर्व्हिनची साहजिकच आठवण झाली. १९२४ मध्ये एव्हरेस्टवर जाण्याच्या प्रयत्नात ते कुठंतरी बेपत्ता झाले होते. त्यांची कुठं काही चिन्हं दिसतात का, हे पाहिलं; पण काही नजरेस पडलं नाही. जगातील त्या सर्वोत्तुंग हिमशिखरावर—एव्हरेस्टवर—गेल्या तेहतीस वर्षांत आमच्या आधी कित्येक शूर आणि थोर गिर्यारोहकांनी चढून जाण्याचा प्रयत्न केला होता. त्यांनी निकराची झुंज दिली; परंतु त्यांना यश मिळालं नाही. त्या सर्वांचं कृतज्ञतापूर्वक स्मरण झालं. कारण त्यांचे प्रयत्न, अनुभव व ज्ञान यांची शिदोरी आमच्या पाठीशी होती, म्हणूनच आम्ही हे भव्य यश मिळवू शकलो होतो. आमच्या तुकडीतील जे अनेक सहकारी आमची वाट पाहत खाली पायथ्याशी थांबले होते त्यांचीही आठवण त्या क्षणी आम्हांला झाली. त्यांच्या मदतीशिवाय, त्यागाशिवाय आणि कष्टांशिवाय आम्ही इथं पोचूच शकलो नसतो. लँबर्टची तर त्या क्षणी विलक्षण तीव्रतेनं आठवण झाली. त्यानं दिलेला लोकरीचा स्कार्फ मी गळ्याभोवती गुंडाळला होता. त्याचं स्मरण झालं तेव्हा माझा हात सहजच त्या स्कार्फकडं गेला.

खाली उतरत असताना जॉर्ज लो प्रथम आम्हांला भेटला. आमच्या गळ्यांभोवती दोन्ही हात टाकून आनंदातिशयानं त्यानं आम्हांला मिठीच

मारली. हंटनंदेखील आम्हां दोघांना कडकडून आलिंगन दिलं, गदगदून हलवलं आणि 'शेरपा' आणि 'साहेब' असा भेद जणू नाहीसा झाला होता. आम्ही सर्वजण एकाच जातीचे—गिर्यारोहक जमातीचे—म्हणून एव्हरेस्टवर पोचलो होतो!



शब्दार्थ व टिपा :

**मुश्कील**—कठीण. **आवरण**—कवच. **टिकाव**—कुदळ. **हिमराशी**—बर्फाचा ढीग. **सर्वोत्तुंग**—सर्वांत उंच. **गिर्यारोहक**—पर्वतावर चढणारा. **ऑक्सिजन सिलेंडर**—प्राणवायू साठवलेली लहान टाकी.

**कपाळमोक्ष होणे**—डोके फुटून मृत्यू येणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. तेनसिंग व त्याचे सहकारी यांनी एव्हरेस्ट शिखरावर चढण्यासाठी कोणकोणती साधने बरोबर घेतली?
२. एव्हरेस्टवर चढताना त्यांना कोणकोणत्या अडचणींना तोंड द्यावे लागले?
३. एव्हरेस्टवर पोचल्यानंतर तेनसिंग यांना कोणत्या गोष्टी आठवल्या?
४. जगातील सर्वोच्च शिखर सर करताना कोणती शिदोरी आपल्या पाठीशी होती, असे तेनसिंग यांनी म्हटले आहे?
५. 'आम्ही सर्वजण एकाच जातीचे', असे म्हणण्यात काय सुचवले आहे?
६. (अ) 'गटागटा' या शब्दासारखे रटारटा, सटासटा, खसाखसा हे शब्द आहेत. त्यांचा उपयोग करून वाक्ये तयार करा.
   (आ) खालील शब्द अचूक उच्चारा व लिहा:
   टणक, अंथरूण, जाकीट, श्वासोच्छ्वास, किंचित, हृदय, कृतज्ञता.
७. 'एक ऐतिहासिक क्षण' असे या पाठाचे शीर्षक आहे. याच प्रकारच्या कायम लक्षात राहणाऱ्या काही ऐतिहासिक घटना मिळवून त्यांची तुमच्या वहीत नोंद करा.

***

# २१ तुरुंगातील दिवस

**शिरुभाऊ लिमये**

*************************************************************

**श्रीधर पुरुषोत्तम लिमये** (जन्म: १९०८)—भारतीय स्वातंत्र्य-संग्रामातील एक नेते. बेचाळीसच्या 'छोडो भारत' चळवळीत भूमिगत राहून कार्य केले. हैद्राबाद संस्थान-विलीनीकरणाच्या लढ्यात आणि गोवा-मुक्तिसंग्रामात दीर्घकाळ कारावास सोसला.

'निवडुंगाची बोंडे' या पुस्तकातून हा उतारा घेतला आहे. गोव्यातील 'अग्वाद' तुरुंगात शिक्षा भोगत असताना विविध पशुपक्ष्यांचे निरीक्षण करण्यात त्यांनी आपले मन कसे गुंतवले याचे सुंदर वर्णन या पाठात केले आहे.



तीन महिने पणजीच्या पोलीस हेडक्वॉर्टर्समध्यें काढल्यानंतर आमची बदली 'अल्तीनो' च्या दुसऱ्या तुरुंगात झाली. ही जागा टेकडीवर व पहिल्यापेक्षा थोडी अधिक हवेशीर होती; पण शिक्षेचा दीर्घकाळ आता इथंच काढायचा आहे ही जाणीव मला झाली आणि तो तुरुंग जणू खायला उठला! यातून आता सुटका नाही हे ध्यानी घेऊन तुरुंगातील जीवनाशी समरस होण्याचे मार्गही मी शोधू लागलो. तुरुंगावरच प्रेम करायला शिकल्यावर मग तो कंटाळवाणा कसा होईल? या विचारानं तिथली माणसं व प्राणीच नव्हेत, तर झाडं नि दगडधोंडे यांच्याकडेही मी आपुलकीनं पाहू लागलो. त्यासाठी खिडकीजवळ तासन्तास उभा राहू लागलो.

एक दिवस पंधरावीस बदकांचा एक कळप मागील आवारात दिसला. बुटक्या, फेंगड्या पायांवर आपली तुंदिल तनू पेलता पेलता बिचाऱ्यांची त्रेधा उडत होती. त्यांची माझी ओळख झाली व लवकरच गट्टीही जमली. रोज सकाळी जणू मला झोपेतून उठवायलाच ती येत. मग रात्रीच्या जेवणातून काढून ठेवलेले पोळीचे तुकडे व केळ्यांच्या साली त्यांना खायला घालून माझा दिवस सुरू होई. एखाद्या वेळी मला उठायला उशीर झाला व त्यांना त्यांची न्याहारी मिळाली नाही म्हणजे त्यांचा निषेधात्मक मोर्चा घोषणा देत तिथंच धरणं धरी! अखेरीस काही ना काही खाऊ मिळवून विजय झाला, की आपल्या चपट्या फत्ताड्या चोचीच्या शेंड्यावरील न दिसणाऱ्या नाकासमोर बघत, पोट जमिनीवर आपटत, डुलत डुलत ती बराकीच्या दुसऱ्या टोकाला जाऊन दिसेनाशी होत. दिवसातून या बदकांच्या अनेक फेऱ्या होत. शेजारीच राहणाऱ्या सोजिरांच्या गरजेप्रमाणे त्यांच्या संख्येत वधघट होई. एक दिवस त्या सोजिरांचा कसला समारंभ होता कुणास ठाऊक; पण एकही बदक कुठं दिसलं नाही. रोज सकाळी कानावर येणारा तो परिचित आवाज बंद झाला व मला चुकल्याचुकल्यासारखं वाटू लागलं; पण त्यांचा हा विरह मला फार सहन करावा लागला नाही.

लवकरच तिथं चार नवी बदकं व काही कोंबड्या वावरू लागल्या. कोंबडा हा माझा फार आवडता पक्षी. चांगला पोसलेला, गुबगुबीत, ऐटबाज तुऱ्याचा व चमकदार कांतीचा कोंबडा मान उंचावून जेव्हा 'कुकूऽऽच-कूऽऽ' असे ओरडतो,



तेव्हा त्याचा तो रुबाब पाहत राहावा असा असतो! मानेला पावलागणिक हिसके देत, चौफेर पाहत, पाय मुडपून एकेक पाऊल टाकत तो चालतो, तेव्हा त्याचा आत्मविश्वास व आपल्या कुटुंबीयांवरील त्याची जरब पाहून घ्यावी! त्याला असं बघितलं म्हणजे पायांत दणकट चढाव, गळ्यात काळा गोफ, हातात सलकडी आणि डोक्याला कोल्हापुरी फेटा बांधून भला मोठा शेमला पाठीवर सोडलेला जणू पैलवानच समोर उभा आहे असं वाटतं!

एक दिवस अचानक एका कोंबडीमागं कापसाच्या आणि रंगीत लोकरीच्या लहान लहान गुंड्यांसारख्या नऊ पिलांची चिमुकली फौज दिसली. त्यांच्या मोहक हालचालींवरून डोळे हलेनात! पंधरा-वीस दिवसांची झाल्यावर ती पिलं अधिकच गोंडस दिसू लागली. आपल्या आईच्या पावलावर पाऊल टाकून दिवसभर भटकणारी ती इवलीशी पिलं थकत कशी नाहीत याचं मला आश्चर्य वाटे. दुपारी उन्हाच्या वेळी कोंबडी कुठं आडोशाला बसली, की काही पिलं तिच्या पाठीवर, काही पोटाखाली, काही बगलेत बसून विश्रांती घेत. ते दृश्य मोठं विलोभनीय दिसे. आई पायांनी केरकचरा फिसकटी व त्यातील किडामुंगी वर आली, की थोडं मागं सरून ती टिपून घेई. ते पाहून पिलं आपल्या नखांएवढ्या पायांनी मातीची थोडी चाळवाचाळव करत. किडामुंगी पाहण्यासाठी थोडं मागं सरावं लागतं, हे मात्र त्यांना समजत नसे. खालच्या पसरलेल्या केरावरच चोची मारून ती उगीचच काहीतरी खोटं खोटं खात. आईनं पाय तणावले, पंख फडफडावले म्हणजे तीही तसं करत. त्या पिलांवर माझं सारखं लक्ष असे. ती स्वतःच्या हिमतीवर आईपासून दूर हिंडूफिरू लागली, तेव्हा मला केवढा आनंद वाटला!

काकोबांकडं मी नंतर वळलो. कावळ्यांच्या कळपाबरोबर खेळू लागलो. मी खिडकीतून टाकलेले पावाचे तुकडे ते हवेतच वरच्यावर अलगद झेलत. या खेळात माझा वेळ कसा जाई ते कळत नसे.

जमिनीवर वावरणारी बदकं व कोंबड्या सोडल्या तर कावळ्याखेरीज दुसरा एकही पक्षी मला त्या दीड वर्षात दिसला नाही! आंबे, फणस, काजू, सुपारी, नारळ इत्यादी फळांची रेलचेल असलेल्या या निसर्गरम्य गोव्यात नाना प्रकारचे

पक्षी असतील अशी माझी सुखद समजूत होती. कुठंही गेलं तरी चिमण्या आढळतातच. त्या दिसतील, निदान त्यांची किलबिल तरी ऐकू येऊन माझी थोडीफार करमणूक होईल असं मला वाटे; पण ते सपशेल खोटं ठरलं.

बदकं, कोंबड्या काय किंवा कावळे, चिमण्या काय, अगदी नित्य दिसणारे पक्षी! त्यांच्या हालचाली पाहण्यात असे तासन्‌तास कुणी वाया घालवील का? पण इथल्या तुरुंगाच्या जीवनात त्यांच्याकडं पाहत बसण्यात माझे तासचे तास निघून जात. त्या एकाकी जीवनात तोच माझा विरंगुळा ठरला. या सोबत्यांनीच माझं तुरुंगातील जीवन सुसह्य केलं. त्यांना मी कसा विसरेन?

शब्दार्थ व टिपा :

**पणजी**—गोव्याची राजधानी. **हेडक्वॉर्टर्स**—प्रमुख ठाणे. **तुंदिल तनू**—लठ्ठ शरीर. **निषेधात्मक मोर्चा**—एखादी गोष्ट आपल्याला मान्य नाही हे दाखवण्यासाठी काढलेली मिरवणूक. **बराक**—सैनिक किंवा कैदी यांची राहण्याची जागा. **सोजीर**—सैनिक, शिपाई. **जरब**—धाक. **विलोभनीय**—सुंदर. **विरंगुळा**—कंटाळा घालवून मन रमवणारी गोष्ट.

**वधघट होणे**—कमी-जास्त होणे. **खायला उठणे**—असह्य होणे. **धरणे धरणे**—एखादी गोष्ट मान्य करून घेण्यासाठी आग्रह धरून बसणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. तुरुंगातील जीवन लेखकाला सुसह्य कशामुळे झाले?
२. बदकांशी दोस्ती करण्याकरता लेखकाने काय युक्ती केली?
३. कोंबडा हा पक्षी लेखकाला विशेष का आवडतो?
४. कोंबडी आपल्या पिलांना कोणत्या गोष्टी शिकवत होती?
५. वाक्यांत उपयोग करा:
खायला उठणे, त्रेधा उडणे, धरणे धरणे, वधघट होणे, चुकल्याचुकल्यासारखे वाटणे.
६. लेखक आपल्या एका मित्राला तुरुंगातून पत्र लिहीत आहे, अशी कल्पना करून ते पत्र दहाबारा ओळींत लिहा.

***



# ही भूमी असे कैकांची

अण्णा भाऊ साठे

*******************************************************

**अण्णा भाऊ साठे** (जन्मः १९२०; मृत्यूः १९६९)—लोकशाहीर, कथालेखक, कादंबरीकार. 'फकिरा', 'माकडीचा माळ' इ. कादंबऱ्या, 'कृष्णाकाठच्या कथा' हा कथासंग्रह, 'शाहीर' हा पोवाडासंग्रह—ही त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'महाराष्ट्राची परंपरा' या पोवाड्यातील एक चौक येथे निवडला आहे. या पोवाड्यात महाराष्ट्राविषयीचा अभिमान समर्थपणे प्रकट झाला आहे.

महाराष्ट्र मायभू आमुची । मराठी भाषकांची । संत महंतांची ।
ज्ञानवंतांना जन्म देणार । नररत्नांचे दिव्य भांडार ।
समरधीर देति जिथे । ललकार ॥ जी ॥
शौर्याची अजरामर महती । आजही नांदती ।
सह्याचलावरती । मावळा दख्खनचा राहणार । स्वाभिमानार्थ
जिणे जगणार । मराठा मानी आणि दिलदार ॥ जी ॥

सह्याद्रि पसरला जिथे शेषासम गिरी ॥
दौलत घेऊनी सत्तावीस गड शिरी ॥
भेसूर कड्यांवर बुरुज पहारेकरी ॥
ताड, माड, सागाची झाडे त्यांच्या शेजारी ॥
कळकिचे बेट आकाशात झुकांड्या मारी ॥

करवंदी, बाभळ आणि बोरी ।
चिल्लार कठिण काटेरी ।
खाली सुपीक शेत-जमीन काळजापरी ॥
महाराष्ट्राची ती शेतसरी । सुवर्ण आणि भूवरी ॥
कापूस, ऊस, गुळभेंडी, तूर, तीळ, हर्बरी ॥

कारळा फुले गोजिरी । उधळून महाराष्ट्रावरी ।
राळ्याचे लोंब पुढे लवून मुजरा करी ॥



महाराष्ट्राच्या अंगणात सरिता या खेळ खेळत ॥
पंचगंगा शीतल शांत । महाराष्ट्रा शांतवीत ।
कोयना, कृष्णा चालत । घालून हातांमध्ये हात ॥
जाउनि पुढे धावत आंध्रालाही कुरवाळीत ॥
वारणा वाहे वेगात । वायुला लाजवीत ॥
पैठण-परभणीत । गोदाचे रमले चित्त ॥
ही भूमी असे कैकांची । नाना धर्मांची । कितिक भाषांची ।
सर्वांना प्राणाहून ती प्यार । मनामधी एक भाव धरणार ।
शाहीर ही परंपरा गाणार ॥

## शब्दार्थ व टिपा :

**समरधीर**—रणांगणात शौर्याने लढणारे वीर पुरुष. **ललकार**—घोषणा. **अजरामर**—जिला म्हातारपण व मरण नाही अशी. **महती**—मोठेपणा. **सह्याचल**—सह्याद्री. **शेषासम**—शेष नावाच्या नागासारखा. **सत्तावीस गड**—सह्याद्रीवरील सत्तावीस गड. **चिल्लार**—एक काटेरी झुडूप. **शेतसरी**—शेती, पिके. **गुळभेंडी**—हुरड्यासाठी प्रसिद्ध असलेली ज्वारीची एक रुचकर जात. **राळा**—वरीसारखा धान्याचा एक प्रकार. **लोंब**—ओंबी-तुऱ्यासारखे लोंबते कणीस.

## प्रश्न व स्वाध्याय :

१. महाराष्ट्रभूमीच्या कोणत्या थोर गुणांचा शाहिराने अभिमानाने उल्लेख केला आहे?
२. सह्याद्रीच्या विशेष गोष्टी कोणत्या?
३. महाराष्ट्राची शेतसरी भूमीवर सुवर्ण आणते असे शाहिराने का म्हटले आहे?
४. महाराष्ट्रातल्या नद्यांचे कोणते विशेष या पोवाड्यात आले आहेत?
५. कोणती परंपरा जपणार, असे शाहीर अभिमानाने म्हणतो? का?
६. 'कळकिचे बेट आकाशात झुकांड्या मारी,' या ओळीत शाहिराने एक चित्र आपल्यासमोर उभे केले आहे. अशी आणखी काही सुंदर शब्दचित्रे या पोवाड्यात आढळतात. ती शोधा व त्यांतील तुम्हांला आवडणारे चित्र काढा.

* * *

# २३ निसर्गातील रंगपंचमी

**प्रकाश गोळे**

*********************************************************

**प्रकाश गोळे** (जन्म: १९३८)—पक्षिजीवनाचे अभ्यासक. 'चक्रवाक देशी', 'एका तळ्यात होती', 'द्विजगण अवघे वृक्षी' इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'निसर्गयात्रा' या पुस्तकातून पुढील पाठ घेतला आहे. वसंतऋतूत अनेक झाडे रंगीबेरंगी फुलांनी डवरून येतात. निसर्गाच्या या सौंदर्याचे लेखकाने किती सुंदर वर्णन केले आहे ते पहा.

.......................................................................

जानेवारीचा पहिला-दुसरा आठवडा असावा. निसर्गातील रंगपंचमी सुरू झाल्याची जाणीव त्या दिवशी अचानक मला झाली. पक्षी पाहण्यासाठी मी अगदी सकाळीच बाहेर पडलो होतो. बहुतेक झाडांची पानं गळून गेली होती. त्यामुळं डोंगरउतार, माळरानं काहीशी भकास दिसत होती. झाडांची पानं गळल्यामुळं त्यांवरील पक्षी पाहणं अगदीच सोपं झालं होतं. सलईच्या पांढऱ्या निष्पर्ण फांद्यांवर येऊन बसणारे पंचरंगी पोपट, भारद्वाजाची छोटी आवृत्तीच असे तुरेवाले बंटिंग, पांढऱ्या शरीराची पण काळ्या पंखांची घार— असे दिमाखदार पक्षी पाहत मी हिंडत होतो. इतक्यात एका झाडाकडं माझं लक्ष गेलं आणि निसर्गातील रंगपंचमी आता सुरू होणार या जाणिवेनं अंगावर रोमांच उभे राहिले.

इतर वृक्ष निष्पर्ण दिसत असले तरी त्या एका वृक्षावरील पर्णराशी मात्र कायम होत्या. शिवाय अनेक पुष्पगुच्छांनी तो बहरला होता. जांभळ्या, निळ्या चमकदार कांतीचे, चिमुकले सूर्यपक्षी जागोजागी फुललेल्या या पांढऱ्याशुभ्र गेंदांवर मध पिण्यासाठी गर्दी करत होते. याशिवाय शिपाई बुलबुल होते, जंगली मैना होत्या. या बहरलेल्या रोहितक वृक्षाकडं लक्ष गेलं, तेव्हाच मला शिशिर संपत आल्याची जाणीव झाली.

त्यानंतर आठवडाभरातच पांगारा फुलू लागला आणि निसर्गातील रंगपंचमीला खरीखुरी सुरवात झाली. ही नयनरम्य रंगांची उधळण किती लोकांना जाणवते कोण जाणे!

हिवाळा सरत आला, की पांगारा, पळस, काटेसावर, गणेरी असे वृक्ष फुलांनी बहरू लागतात. या वेळी या झाडांवरची सर्व पानं गळून जातात आणि फुलांनी भरगच्च झालेली ही झाडं इतकी सुंदर दिसतात, की त्यांवरून दृष्टी काढवत नाही.

जानेवारी महिना संपण्यापूर्वीच पांगारा बहरण्यास सुरवात होते. एकीकडं पानं गळून पडत असतात आणि दुसरीकडं भडक तांबडी, कुंकवाच्या रंगाची फुलं फांद्याफांद्यांवर उमलत असतात. मिटलेल्या, वळलेल्या पानांच्या आकारांचे हे तुरे झाडांवर ठायी ठायी फुटू लागतात आणि या पुष्पमालांनी बहरलेलं हे झाड अतिशय सुंदर दिसतं. या फुलांमध्ये मधही भरपूर असतो. मैना, बुलबुल, सातभाई, सूर्यपक्षी, सुगरण, भोरडी हे सुंदर सुंदर पक्षी या वृक्षांवर मध पिण्यासाठी गर्दी करतात.

मोठ्या, सरळ बुंध्याच्या काटेसावरीच्या झाडांची पानंही जानेवारी महिन्यातच गळून पडतात आणि फांद्यांवर कळ्यांचे गुच्छ लटकलेले दिसतात. काही दिवस हे निष्पर्ण झाड अगदीच ओकंबोकं, भकास दिसतं. मग मात्र एकेक कळी उमलू लागते आणि थोड्याच दिवसांत तांबड्या भडक फुलांनी सारं झाड बहरून जातं. पाच पाकळ्यांची, पिवळं केसर असलेली ही लाल रंगाची फुलं भलीमोठाली असतात. लाल फुलांनी हे वृक्ष डवरले, की जे दृश्य दिसतं त्याचं वर्णन शब्दांनी होणं शक्य नाही.

काटेसावरीच्या फुलांतही मध भरपूर असतो त्यामुळं या फुलांवर मध पिण्यास तऱ्हेतऱ्हेचे पक्षी येतात. या झाडाच्या जवळ उभं राहिलं, की जवळपासचे बहुतेक सारे पक्षी एका ठिकाणी पाहिल्याचं सुख मिळतं. रायगड जिल्ह्यातील कर्नाळा इथं पक्ष्यांचं अभयारण्य आहे. तिथल्या बंगल्यासमोर काटेसावरीचं एक झाड आहे. ते झाड बहरलं, की हिरवा बुलबुल, हळद्या यांसारखे सुंदर पक्षी या फुलांतील मध प्यायला येतात आणि अभयारण्यात खूप

भटकूनही जे बघायला मिळणार नाहीत ते सुंदर पक्षी बंगल्याच्या व्हरांड्यात बसून विनासायास दिसतात.

तांबडट-नारिंगी रंगाच्या फुलांनी डवरलेला पळसही असाच सुंदर दिसतो. पळसाची फुलंही पक्ष्यांना आकर्षित करणारी आहेत. पळस, पांगारा, काटेसावर या लाल रंगांची फुलं असलेल्या वृक्षांचं बी वाहून नेण्याचं कार्य पक्षीही करतात. यांपैकी काटेसावरीच्या झाडांची संख्या सर्वांत जास्त असावी. लाल फुलांनी डवरून गेलेली ही झाडं कशी छान दिसतात!

आपल्या रानात असा आणखी एक पुराणवृक्ष पाहायला मिळतो. हा वृक्ष म्हणजे कदंब होय. उन्हाळ्याच्या सुरवातीला त्याच्या अंगावरही पांढऱ्या नाजूक फुलांचे अलंकार चढतात आणि त्या फुलांच्या मंद सुवासानं सारा आसमंत दरवळून जातो. धायटीच्या लालचुटूक फुलांचे फुलोरे आणि पिवळी गणेरी ही आपल्या जंगलाची आणखी दोन वैशिष्ट्ये. काटेसावरीच्या पाठोपाठच गणेरीही फुलते.

हे सर्व वृक्ष काही काळ नटून झाल्यावर आपला साज उतरवून पुन्हा पर्णवेश धारण करू लागतात न लागतात, तोच जाकरंदा फिके जांभळे तुरे लेऊन



सामोरा येतो. पाठोपाठ कॅशियाचे गुलाबी तुरेही उमलतात. लाल, शेंदरी गुलमोहोर फुलतो आणि बाहाव्याचे पिवळेजर्द घोस असलेलं देखणं झाड पाहून आपलं मनही मोहरून जातं. निसर्गाची ही अपूर्व रंगपंचमी थेट चैत्र सरेपर्यंत अखंड चालू असते.

शब्दार्थ व टिपा :

**निष्पर्ण**—पाने नसलेले. **पर्णराशी**—पानांची दाट गर्दी. **नयनरम्य**—डोळ्यांना सुखवणारे; सुंदर. **विनासायास**—श्रम न पडता. **पुराणवृक्ष**—खूप जुने झाड. **ओकेबोके**—उघडेवाघडे.

**मन मोहरून जाणे**—आनंदित होणे.

**सलई**—हे झाड जंगलामध्ये त्याच्या बदामी, पांढऱ्या व गुळगुळीत खोडामुळे चटकन लक्षात येते. त्याचे मऊ लाकूड फळे पाठवण्याच्या पेट्या तयार करण्यास वापरतात.



**जाकरांदा**—मध्यम आकाराचे एक शोभेचे झाड. उन्हाळ्यात हे झाड सुंदर अशा निळसर जांभळ्या फुलांनी लगडते व फार मोहक दिसते.

**कॅशिया**—हे झाड गुलाबी फुलांच्या गुच्छांनी उन्हाळ्यात बहरते व फार सुंदर दिसते.

**बाहावा**—मध्यम आकाराचे, टोकदार पानांचे एक झाड. उन्हाळ्यात हे सबंध झाड पिवळ्या फुलांच्या घोसांनी बहरते. याला 'अमलतास' असेही म्हणतात.

प्रश्न व स्वाध्याय :

१. निसर्गाची रंगपंचमी कोणती? ती केव्हा सुरू होते?
२. हिवाळा सरत आला की कोणकोणते वृक्ष फुलांनी बहरू लागतात?
३. पांगारा बहरल्यावर कोणते पक्षी तिथे गर्दी करतात?
४. आपल्या जंगलांची आणखी दोन वैशिष्ट्ये कोणती?
५. जाकरांदा, कॅशिया आणि बाहावा ही झाडे केव्हा फुलतात?
६. या पाठातील कोणते झाड तुम्हांला सर्वांत अधिक आवडते? का?
७. तुमच्या आवडीच्या झाडाचे चित्र काढा व ते रंगवा.

* * *





२४

# प्रकाशपूजक डॉ.सी.व्ही. रामन

**राम ताकवले**

**********************************************************

**रामचंद्र गोविंद ताकवले** (जन्म: १९३३)—भौतिकीचे प्राध्यापक. भौतिकीचे उच्च शिक्षण त्यांनी रशियात घेतले. शैक्षणिक प्रश्नांच्या अभ्यासासाठी अनेक राष्ट्रांना भेटी दिल्या. देशीविदेशी नियतकालिकांतून विज्ञान व शिक्षणविषयक लेखन केले.

भारताची कीर्तिपताका सर्वप्रथम जगभर फडकवणारे एक थोर शास्त्रज्ञ म्हणजे डॉ. सी. व्ही. रामन. आपल्या प्रकाशविषयक संशोधनाने त्यांनी नोबेल पारितोषिकाचा सर्वोच्च सन्मान मिळवला आणि आपल्या देशाची मान उंच केली. त्यांच्या कार्याचा अल्पपरिचय इथे करून दिला आहे.

..........................................................

ही घटना आहे १९३० सालची. डॉ. चंद्रशेखर व्यंकट रामन यांनी आपल्या प्रकाशविषयक संशोधनाने विज्ञानात महत्त्वाची भर घातली म्हणून त्यांना 'नोबेल पारितोषिक' बहाल करण्यात आले. या बातमीने अवघ्या भारतात नवचैतन्य सळसळले. वेगवेगळ्या क्षेत्रांत मोलाची भर घालणाऱ्यांना दरवर्षी नोबेल पारितोषिके देण्यात येतात. हा सन्मान मिळवणारे डॉ. रामन हे

युरोप-अमेरिकेबाहेरचे पहिले वैज्ञानिक. विज्ञानाच्या क्षेत्रात अग्रभागी असणाऱ्या देशांच्या मालिकेत भारताला डॉ. रामन यांच्यामुळे स्थान मिळाले. 'रामन परिणाम' (रामन इफेक्ट) म्हणून त्यांचा हा शोध विज्ञानाच्या इतिहासात कायमचा नोंदला गेला आहे. जोवर जगात प्रकाश आहे तोवर रामन यांचे नाव कोणी विसरू शकणार नाही!

श्री. रामनाथ चंद्रशेखर अय्यर हे यांचे वडील. ते विज्ञानाचे अध्यापक होते. आपल्या वडलांच्याकडून त्यांना विज्ञानप्रेमाचा वारसा मिळाला. घरात नेहमी विज्ञानविषयक चर्चा त्यांना ऐकायला मिळे. विज्ञानविषयक पुस्तके त्यांना वाचायला मिळत. वैज्ञानिकाची म्हणून एक शिस्त असते. ती त्यांनी अंगी बाणवली. वैज्ञानिकाला आपल्याभोवती असणाऱ्या प्रत्येक वस्तूबद्दल व तिच्या जडणघडणीबद्दल जिज्ञासा असते, कुतूहल असते. प्रत्येक गोष्टीच्या संदर्भात 'का?', 'याचे कारण काय?' असे प्रश्न शास्त्रज्ञ स्वतःला विचारत राहतो. त्याचे उत्तर शोधतो आणि प्रयोग करून ते उत्तर तपासून घेतो. प्रत्येक गोष्टीचा कार्यकारणभाव समजल्यावाचून तो स्वस्थ बसूच शकत नाही. कारण कोणतीही गोष्ट घडते त्यामागे काही कारणे असतात, म्हणून सतत निरीक्षण, कोणत्याही गोष्टीमागील कारणांचा शोध, त्यासंबंधी करायचे प्रयोग आणि त्यांतून हाती येणारे निष्कर्ष असे हे चक्र सतत फिरते ठेवणे म्हणजेच विज्ञानाची उपासना.

विज्ञानाच्या क्षेत्रात युरोप त्या काळात आघाडीवर होता. नव्या नव्या शोधांमुळे तिथले लोकजीवनच पालटून गेले होते. विचारांना नवी दिशा आणि गती मिळाली होती. ज्ञानात सतत भर पडत होती. प्रयोगशाळांतून नाना प्रयोग सतत चालले होते. डॉ. रामन यांना हे जाणवले होते, की विज्ञानाच्या क्षेत्रात आपण त्या देशांच्या बरोबरीला आले पाहिजे. त्याच दृष्टीने त्यांना विज्ञानाच्या क्षेत्रात तिथे चाललेले काम पाहायचे होते, अनुभवायचे होते; म्हणून संधी मिळताच बोटीने ते इंग्लंडला जायला निघाले.

लहानपणी वडलांच्या नोकरीच्या गावी त्यांना सागराची ओळख झाली होती. त्याबद्दल प्रेम वाटत होते. कुतूहलही जागे झाले होते.

आकाशाबद्दलही तसेच कुतूहल त्यांना होते. बोटीच्या प्रवासात तर सागर आणि आकाश हेच त्यांचे सोबती झाले. तासन्तास डेकवर उभे राहून रामन त्यांची ती रंगशोभा पाहत आणि विचारात गढून जात. ही किमया प्रकाशाची आहे, हे त्यांना माहीत होते; पण तिचे रहस्य त्यांना ज़ाणून घ्यायचे होते, उलगडायचे होते.

आरशावरून प्रकाश परावर्तित होतो. बहिर्गोल भिंगातून जाताना तो एकत्र होतो आणि त्यात कापूस धरला तर कापूस पेटतोदेखील. सूर्यकिरण लोलकातून गेला, की अनेकरंगी प्रकाश दुसऱ्या बाजूने बाहेर पडतो. हंड्या-झुबरांची अपूर्व शोभा त्यामुळेच निर्माण होते. ठराविक रंगाचे सात पट्टे असणारी भिंगरी जोराने फिरवली, की ती पांढऱ्या रंगाची दिसू लागते. पावसाळ्यात कधी कधी एक किंवा दोन इंद्रधनुष्ये आकाशात दिसतात. साबणाच्या पाण्याचे फुगे उडवण्याचा खेळ खेळताना त्या फुग्यांवरही रंगांची अशीच गंमत पाहायला मिळते. प्रकाशाचा विविध पृष्ठभागांशी संबंध आल्यामुळे या सर्व गोष्टी घडतात. प्रकाशलहरी वेगवेगळ्या लांबीच्या असतात. पृष्ठभागाशी संबंध आला, की त्यांची लांबी त्यामुळे बदलते आणि त्यातून ही रंगांची किमया निर्माण होते हे सारे त्यांना जाणवले.

प्रकाशलहरींमध्ये होणाऱ्या अशा बदलांचा अभ्यास केला तर त्यावरून लहरींचा संबंध आलेल्या पृष्ठभागांच्या रचनेचेही रहस्य उलगडू शकेल, असे डॉ. रामन यांना वाटले. लगेच त्या दिशेने त्यांनी अभ्यास आणि प्रयोग सुरू केले. प्रकाशकिरण अणुरेणूच्या पृष्ठभागांवरून परावर्तित होतात; त्यामुळे प्रकाशलहरींच्या लांबीत व रंगांत फरक पडतो. त्या निरीक्षणामुळे त्या त्या वस्तूंची अंतर्रचना कळून येते. यालाच 'रामन इफेक्ट' असे नाव पडले आहे.

भौतिकीच्या क्षेत्रात डॉ. रामन यांना नोबेल पारितोषिक मिळाले. भारतातील वैज्ञानिकांना त्यामुळे मोठाच हुरूप आला. आपण आपल्या कर्तृत्वाने जगातील आघाडीवरच्या राष्ट्रांच्या मालिकेत जाऊन बसू शकतो, असा आत्मविश्वास त्यांना वाटू लागला.

'इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्स' ही संस्था डॉ. रामन यांच्यामुळे बंगलोरला स्थापन झाली. विज्ञानाची आवड असणारे विद्यार्थी भारताच्या सर्व भागांतून त्यांच्याकडे संशोधनासाठी येऊ लागले. या विद्यार्थ्यांनी विज्ञानप्रेमाचे लोण देशभर पसरवले.

स्वतंत्र भारताला समृद्ध,संपन्न व बलवान करायचे असेल तर विज्ञानाच्या अभ्यासाला व प्रयोगांना चालना दिली पाहिजे, असे भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू नेहमी म्हणत. डॉ. रामन व त्यांच्यासारखे इतर वैज्ञानिक यांनी जे विज्ञानप्रेम लोकांत सतत जागवले, त्यामुळे देशामध्ये वैज्ञानिक प्रयोगशाळांचे जाळे पसरवण्याचे काम झपाट्याने होऊ शकले आणि म्हणूनच आज आपल्या देशात जी वैज्ञानिक प्रगती दिसते तिचा पाया डॉ. रामन यांनी घातला आहे.

शब्दार्थ व टिपा :

**नवचैतन्य**—नवा उत्साह. **वैज्ञानिक**—शास्त्रज्ञ, विज्ञानाचा जिज्ञासू अभ्यासक. **अग्रभागी**—आघाडीवर. **उपासना**—साधना. **निष्कर्ष**—सार. **किमया**—जादू. **अणुरेणू**—पदार्थांचे सूक्ष्म कण. **परावर्तन**—किरण विशिष्ट पृष्ठभागावर पडले की ते दुसरीकडे वळतात. या क्रियेला 'परावर्तन' असे म्हणतात.

**लोण पसरवणे**—प्रसार करणे. **पाया घालणे**—एखाद्या गोष्टीचा आरंभ करणे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. डॉ. रामन यांना विज्ञानाची गोडी कशामुळे लागली?
२. 'वैज्ञानिकाची म्हणून एक शिस्त असते,' ती कोणती?
३. प्रकाशाचा अभ्यास करावा असे त्यांच्या मनाने का घेतले?
४. डॉ. रामन यांना कोणत्या शोधाबद्दल नोबेल पारितोषिक मिळाले?
५. स्वतंत्र भारताला समृद्ध, संपन्न व बलवान करायचे असेल, तर काय केले पाहिजे असे पंडित जवाहरलाल नेहरू म्हणत?
६. विज्ञानाची उपासना म्हणजे काय? ती आपण का करावी?
७. डॉ. जगदीशचंद्र बोस, डॉ. होमी भाभा, डॉ. विक्रम साराभाई या भारतीय शास्त्रज्ञांची चित्रे व माहिती मिळवा.

* * *

# २५ लावणी गिरणीची

## नारायण सुर्वे

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**नारायण गंगाराम सुर्वे** (जन्मः १९२६)—'ऐसा गा मी ब्रह्म!', 'माझे विद्यापीठ', 'जाहीरनामा', 'सनद' हे त्यांचे काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत.

लावणी हा मराठीतील एक लोकप्रिय काव्यप्रकार असून आपल्या मराठी भाषेचे ते खास वैशिष्ट्य आहे. शहरातील एका कापडगिरणीचे, तिथल्या रंगीबेरंगी, विविध वस्त्रांचे, आणि ती वस्त्रे विणणाऱ्या कामगारांचे किती सुंदर चित्र कवीने रेखाटले आहे ते पहा.

सात वाजता सकाळी । भोंगा वाजवी भूपाळी ।
सुरु होते पहिली पाळी । मोठ्या डौलात ।
चाक फिरे गरगरा । सूत निघे भरभरा ।
नटवाया वसुंधरा । आमच्या घामातुन ॥

लेवुन सूत नऊवारी । नखरा बाबीणीचा भारी ।
कांडी गोल फेरे मारी । मग साच्यातुन ।
झडपीनं घालुन वारा । कापसा न देई थारा ।
जोडुन तुटलेल्या तारा । तारा जुळवून ॥

ऐका घामाची कहाणी । फिरवी कळ जादूवानी ।
तंतूतंतूला जोडूनी । वस्त्र गुंफून ।
रंग घेउन आभाळाचा । हिरव्या सोनाळ शेताचा ।
सातरंगी इंद्रधनुत । वस्त्र भिजवून ॥



नाना ऋतूंच्या हो कळा । खुलवी माझा वस्त्रमळा ।
मरवा मोतिया पिवळा । तुरा खोवून ।
झोंबती चैत्राच्या झळा । भिजे श्रावणात शेला ।
ऊब चोरितो हिवाळा । हेरून ऋतुंचा हा चाळा ।
विणतो माझा कबीर भोळा । जगा नटवून ॥

मलमल आणिक दोरवा । झोक साडीचा हिरवा ।
शालू पैठणी भगवा । झळ्के पीतांबर ।
शोभे काळी चंद्रकळा । मोरपिसावानी डोळा ।
जणू गुलाबाचा कळा । टाकी भुलवून ॥

शब्दार्थ व टिपा :

**भूपाळी**—देवाला जागे करण्यासाठी पहाटे म्हटले जाणारे गीत. **वसुंधरा**—पृथ्वी. **बाबीण**—सूत गुंडाळण्याची कांडी. **साचा**—वस्त्र विणण्याचा माग. **झडपी**—सूत तयार करताना त्यावर बारीक तंतू बसून ते तुटू नये म्हणून एका फडक्याने वारा घालतात त्याला झडपी म्हणतात. **सोनाळ**—सोनेरी.

**ऋतूंच्या कळा**—उन्हाळा, पावसाळा व हिवाळा या तिन्ही ऋतूंचे गुणधर्म—ऊन, पाऊस व थंडी. **चाळा**—विशिष्ट सवय किंवा छंद. **कबीर**—प्रसिद्ध भारतीय संत. **पीतांबर**—धार्मिक विधी करताना नेसावयाचे रेशमी वस्त्र. **काळी चंद्रकळा**—खडी काढलेले काळ्या रंगाचे लुगडे.

प्रश्न व स्वाध्याय :

१. गिरणीची पहिली पाळी केव्हा सुरू होते?
२. 'नखरा बाबीणीचा भारी' असे का म्हटले आहे?
३. झडपीने वारा का घालतात?
४. 'नाना ऋतुंच्या हो कळा । खुलवी माझा वस्त्रमळा,' यातील कल्पना स्पष्ट करा.
५. 'भोळा' असा उल्लेख कोणाचा केला आहे? कवीला त्यातून काय सुचवायचे आहे?
६. कोणकोणत्या वस्त्रांचे व त्यांच्या रंगांचे उल्लेख या कवितेत आले आहेत?
७. 'शोभे काळी चंद्रकळा । मोरपिसावानी डोळा ।' यासारख्या काही सुंदर सुंदर कल्पना या कवितेत आल्या आहेत, त्या शोधा. व त्या तुमच्या भाषेत लिहून ठेवा.

***




# मायेचा पाझर

यदुनाथ थत्ते

************************************************************

**यदुनाथ थत्ते** (जन्म: १९२२)—'साधना' साप्ताहिकाचे माजी संपादक. सामाजिक कार्यकर्ते. मुलांसाठी अनेक बोधपर पुस्तके यांनी लिहिली आहेत. 'आचार्य विनोबा', 'पुढे व्हा', 'यशाची वाटचाल', 'वाळवंटातील झरे', 'सदानंद' ही त्यांतली काही पुस्तके.

कमलाबाई होस्पेट या एक थोर समाजसेविका. स्त्रियांची दु:खे कळकळीने जाणून घेऊन त्यांच्या उन्नतीसाठी कमलाबाई आयुष्यभर झटल्या. त्यांच्या विविध कार्यांची ओळख या पाठात करून दिली आहे.

............................................................

नागपूरच्या सीताबर्डी भागात एक भव्य इमारत उभी असलेली दिसते. दारात रुग्णवाहिकांचा तांडाही दिसतो. अनेक रिक्षा उभ्या असतात. माणसांची सारखी वर्दळ चालू असते. पांढऱ्या पोशाखातल्या आरोग्य-सेविका धावपळ करताना आढळतात. दारावर 'मातृसेवासंघ' असा फलक आहे. रुग्णांची—मुख्यत: स्त्रियांची व बालकांची—अनेक प्रकारची सेवा इथे उपलब्ध आहे. याशिवाय रक्तपेढी आहे. आरोग्य-सेविकांना प्रशिक्षण देण्याची व्यवस्था आहे. 'समाजकार्य महाविद्यालय,' मतिमंद मुलांसाठी 'नंदनवन' अशा

अनेक संस्थाही आहेत. मनात सहज विचार येतो, की एवढा पसारा कुणी बरे उभा केला असेल?

याच्या निर्मात्या आहेत कमलाबाई होस्पेट!

कोण या बाई?

नाशिक जिल्ह्यातील येवले तालुका. तालुक्यातले एक गाव नगरसूल. गाव लहानसेच. या छोट्याशा गावात मोहनी कुटुंबात एक मुलगी जन्मली. तिचे नाव ठेवले यमू. आपल्या भावंडांबरोबर यमू लहानाची मोठी होऊ लागली.

त्या काळात मुलींची लग्ने लहानपणीच होत. यमूच्या लग्नासंबंधी घरात बोलणी सुरू झाली. तेरा वर्षांची यमू ही सौ. कमलाबाई गुरुनाथ होस्पेट बनून हुबळीला सासुरवाशीण म्हणून गेली. लग्नानंतर कमलाबाईंचे पती काही दिवसांतच आजारी पडले. कमलाबाई त्यांची सेवाशुश्रूषा करू लागल्या. आजाराला काही केल्या उतार पडेना आणि एक दिवस त्यांची जीवनज्योत विझली.

सासूबाई कमलाबाईंवर खेकसू लागल्या. आकांडतांडव करू लागल्या. जो येईल त्याच्यापुढे बडबडू लागल्या. त्या काळी विधवांची स्थिती फार करुण होती. त्यांचे केशवपन करून त्यांना विद्रूप करत. यमूवरही हाच प्रसंग येऊ घातला होता.

यमूने भावाला त्याबद्दल कळवले. भाऊ लगोलग धावून आला. पोलिसांच्या मदतीने केशवपनाच्या या दुष्ट प्रकारातून त्याने बहिणीची सुटका केली आणि तो तिला माहेरी घेऊन गेला.

या लग्नामुळे तिच्या वाट्याला फक्त दोन गोष्टी आल्या. एक म्हणजे 'कमलाबाई होस्पेट' हे जरा वेगळे दिसणारे नाव आणि दुसरे म्हणजे 'वैधव्य'!

कमलाबाई होस्पेट परत आल्या; पण पुढे काय, हा प्रश्न उभा ठाकला. त्या काळात नर्सिंगचे शिक्षण घेणे हे कमीपणाचे समजत; पण कमलाबाई होस्पेट यांनी निर्भयपणे ते शिक्षण घ्यायचे ठरवले. रोग्यांची सेवा करायला माणसे हवीत, मग आपण त्यांपैकी एक का होऊ नये?

नर्सिंगचे शिक्षण घेण्यासाठी त्या नागपूरच्या डफरिन रुग्णालयात दाखल झाल्या. तिथे त्यांच्याच विचाराची वेणू नेने नावाची एक महिलाही शिक्षण घेत होती.

या रुग्णालयात भारतीय रोग्यांना हिडीसफिडीस करत. एकदा एका खूप आजारी असलेल्या बाईला कमलाबाईंनी बेडपॅन दिले तर त्यांची मेट्रन खेकसली—'तिला काय करायचंय बेडपॅन? जाऊ दे तिला तिकडं संडासात.'

कमलाबाई म्हणाल्या, ''तिला चालवत नाही. अशा रोग्यांसाठी तर ही व्यवस्था असते ना?''

त्यावर मेट्रन कुत्सितपणे हसली.कमलाबाईंच्या हृदयाला इंगळ्या डसल्या. रोग्यांतही काळा-गोरा, श्रीमंत-गरीब, उच्च-नीच असे भेद! त्या व्यथित झाल्या. यावर काहीतरी केले पाहिजे असे त्यांच्या मनाने घेतले. त्यांनी आणि वेणूताईंनी ठरवले, की असा कोणताही भेदभाव न करणारी संस्था आपण स्वतःच काढायची.

त्यांचा नर्सिंगचा अभ्यासक्रम पूर्ण झाला. मग जागा भाड्याने घेऊन त्या दोघींनी एक लहानसे प्रसूतिगृह सुरू केले. बाळ-बाळंतिणींची व्यवस्था त्याच पाहत. बाळंतिणीला आणि बाळाला न्हाऊ-माखूही त्याच घालत. समाजकल्याणाचे कोणतेही काम चांगलेच असे मानून त्यात श्रेष्ठ-कनिष्ठ असा भेदभाव करत नसत. त्यामुळे त्यांच्याकडे आल्यावर स्त्रियांना माहेरी आल्यासारखे वाटायचे. घरी परतताना त्यांचा पाय निघता निघत नसे.

अडीअडचणीला कुणीही कमलाबाईंकडे धाव घ्यावी. कुणाची कसलीही अडचण असो, त्याला कधीही त्या विन्मुख पाठवत नसत.

बापूराव ठाकरे नावाचा एक माणूस पांगळा झाला. तो हताश झाला. अशा परावलंबी अवस्थेत जगण्यापेक्षा मरण बरे असे वाटून तो जीव द्यायला निघाला. हे कळताच कमलाबाईंनी त्याला परत आणले. त्याला धीर दिला. जे आपल्याजवळ नाही त्यासाठी केवळ कुढत बसण्याऐवजी, जे आहे त्याचा लोकांसाठी उपयोग करावा, हे त्यांनी बापूरावाला शिकवले. त्याला टेलिफोनसंबंधीचे शिक्षण दिले. आणि मग त्याला आपल्या स्वागतकक्षात

टेलिफोनजवळ बसवले. परावलंबी बापूराव स्वावलंबी झाला. मातृसेवा-संघाचा तो एक निष्ठावंत कार्यकर्ता झाला. त्याच्यामध्ये नवा आत्मविश्वास निर्माण झाला. त्याच्या लेखनकौशल्याला वाव देण्यासाठी कमलाबाईंनी 'मातृसेवा' मासिक सुरू केले. अशा अनेकांना त्यांनी मदतीचा हात दिला. आग असो, महापूर असो, रोगराई असो त्या धावून जात. निराधारांना आधार देत. ज्यांना कुणी नाही अशी कितीतरी पोरकी मुले त्यांनी सांभाळली, वाढवली.

अपंग मुलांवर बाईंची विशेष माया. वैज्ञानिक उपकरणे वापरून त्यांनी आपल्या अपंगत्वावर मात करावी, म्हणून त्या धडपडत. सर्वांत वाईट अवस्था मतिमंद मुलांची असते. वयाबरोबर शरीर वाढते; पण बुद्धी वाढत नाही. बहुतेक लोक अशा मुलांचा राग, तिरस्कार करतात. अशा मतिमंद मुलांसाठी 'नंदनवन' नावाची एक संस्था त्यांनी सुरू केली. त्यांना शिकवणारी, माया लावणारी माणसे तयार केली. 'जयास जगात कोणी नाही, तयाची होईन मी आई' ही जणू त्यांची प्रतिज्ञा!

त्यांची आई त्यांना म्हणाली, 'यमे, बायका-मुलांसाठी तू इतकं केलंस. म्हाताऱ्याकोताऱ्यांसाठीही काही कर ना. आपण कुणालाही हवंसं वाटत नाही, ही जाणीव किती भयंकर आहे!' आईची ही इच्छा कमलाबाईंनी पूर्ण केली. नागपूर-उमरेड रस्त्यावर अशा वृद्धांसाठी त्यांनी 'पंचवटी' उभारली.

अनेक मानसन्मान बाईंकडे चालत आले. उत्तम रुग्णसेवा करणाऱ्याला 'नलुआ पदक' दिले जाते. कमलाबाईंना ते पदक सन्मानपूर्वक देण्यात आले. 'पद्मश्री' बहाल करून भारत सरकारनेही त्यांचा गौरव केला. महिलांसाठी विशेष कार्य करणाऱ्या महिलेला दरवर्षी श्रीमती जानकीदेवी बजाज यांच्या नावे एक पुरस्कार दिला जातो. तो बहुमानही त्यांना लाभला.

कमलाबाईंचा जन्म १८९६ सालचा. १५ नोव्हेंबर १९८१ रोजी त्यांनी जगाचा निरोप घेतला. पंचाऐंशी वर्षांच्या आयुष्यातली तब्बल साठ वर्षे त्यांनी लोकांच्या सेवेत वेचली.

आता त्या आपल्यात नाहीत; पण त्यांनी स्थापलेल्या 'मातृसेवासंघा'च्या बावीस शाखा मागे उभ्या आहेत. त्यांचा हा वारसा त्या पुढे चालू ठेवतील आणि 'मातृसेवासंघा'च्या रूपाने त्यांची पवित्र स्मृती समाजसेवेची प्रेरणा सदैव देतच राहील.

शब्दार्थ व टिपा:

**रुग्णवाहिका**—रोग्यांना इस्पितळात नेण्यासाठी आवश्यक त्या सोईंनी युक्त असे वाहन. **मतिमंद**—कमी बुद्धी असलेला. **खेकसणे**—रागावून ओरडणे. **बेडपॅन**—मलमूत्र विसर्जनासाठी रोग्याला देण्यात येणारे भांडे. **मेट्रन**—मुख्य रुग्ण-सेविका; नर्स. **केशवपन**—पतीच्या निधनानंतर विधवा स्त्रीचे केस कापून टाकण्याची जुन्या काळातील एक अनिष्ट रूढी. **स्वागतकक्ष**—आल्यागेल्यांना बसण्यासाठी असलेली कार्यालयातील एक खास खोली.

**जीवनज्योत विझणे**—आयुष्य संपणे. **आकांडतांडव करणे**—संतापाने हातवारे करत भलभलते बोलणे. **हिडीसफिडीस करणे**—दुसऱ्याला कमी लेखून एकसारखे टोचून बोलणे. **इंगळ्या डसणे**—मनाला झोंबणे; वेदना होणे. **व्यथित होणे**—दुःखी होणे.

प्रश्न व स्वाध्याय:

१. 'मातृसेवासंघा'त कोणकोणत्या सेवा उपलब्ध आहेत? आणखी इतर कोणत्या संस्था तिथे आहेत?

२. कमलाबाईंच्याकडे आल्यावर बाळंतीण स्त्रियांना माहेरी आल्यासारखे का वाटे?

३. कमलाबाईंनी बापूरावांमध्ये कशामुळे आत्मविश्वास निर्माण केला?

४. 'जयास जगात कोणी नाही, तयाची होईन मी आई,' ही जणू त्यांची प्रतिज्ञा होती, हे कोणकोणत्या गोष्टींवरून दिसून येते?

५. कोणते मानसन्मान कमलाबाईंकडे चालत आले?

६. कमलाबाईंची पवित्र स्मृती सदैव कोणती प्रेरणा देत राहील? कोणत्या रूपाने?

७. (अ) पुढील शब्दांना त्याच अर्थाचे दुसरे शब्द द्या:
वर्दळ, मुलगी, खेकसणे, निर्भयपणे, मानसन्मान.

(आ) श्रेष्ठ-कनिष्ठ या जोडशब्दासारखे आणखी काही शब्द या पाठात आले आहेत ते शोधा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

(इ) कमलाबाईंचा हा परिचय-लेख वाचल्यावर तुम्हांला आपल्या भावी आयुष्यात कोण व्हावे असे वाटते? का?

***

# अन्योक्ती

२७ कृष्णशास्त्री चिपळूणकर

*****************************************************

**कृष्णशास्त्री हरी चिपळूणकर** (जन्म: १८२४; मृत्यू: १८७८) — 'पद्यरत्नावली' हा त्यांचा कवितासंग्रह व 'रासेलस', 'अरबी भाषेतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टी' ही त्यांची अनुवादित पुस्तके.

'लेकी बोले सुने लागे' अशी मराठीत एक म्हण आहे, ती आपल्या सर्वांच्या परिचयाची आहेच. या पद्धतीच्या लिहिण्या-बोलण्याला 'अन्योक्ती' असे म्हणतात. हा भाषेचा एक अलंकार आहे. अशा काही अन्योक्ती येथे दिल्या आहेत.

.....................................................

**मयूरान्योक्ती**

झाडें पेटुनि वाजती कडकडां, त्यांचा ध्वनी होतसे,
ज्वाला राहुनि राहुनी उठति या, विद्युल्लता ही नसे,
काळा धूर नभीं बहू पसरला, हा मेघ नोहे खरा,
वर्षाकाळ न हा, दवानल असे, मोरा, पळे रे घरा.



**शुकान्योक्ती**

फळे मधुर खावयां असति, नित्य मेवे तसे,
हिरेजडित सुंदरी कनकपंजरींही वसे,
अहर्निश तथापि तो शुक मनांत दुःखें झुरे,
स्वतंत्र वनवृत्तिच्या घडिघडी सुखातें स्मरे.

## बकान्योक्ती

उभा राहे एके चरणि धरणीतें धरुनियां,
तपश्चर्या वाटे करित जणु डोळे मिटुनिया.
बका, ऐशा ढोंगें तव अमति मासेच ठकती,
परि ज्ञाते तूझें कपट लवलाहीं उमजती.



शब्दार्थ व टिपा :

**विद्युल्लता**— चमकणारी वीज. **दवानल**—वणवा. **शुक**—पोपट. **कनकपंजर**—सोन्याचा पिंजरा. **अहर्निश**—रात्रंदिवस. **वनवृत्ती**—वनातला विहार. **बक**—बगळा. **अमति**—निर्बुद्ध; मूर्ख. **ठकती**—फसतात. **ज्ञाते**—जाणते, शहाणे लोक. **लवलाही**—तात्काळ.

प्रश्न व स्वाध्याय :

१. वणवा पेटला म्हणजे काय काय होते? वणवा पाहून मोराची कशी फसगत होते?
२. पिंजऱ्यातला पोपट का दुःखी आहे?
३. बगळ्याच्या ढोंगाला कोण फसते? का?
४. तुम्ही वाचलेल्या 'अन्योक्ती'सारख्या इतर अन्योक्तींचा संग्रह करा व शिक्षकांच्या मदतीने त्यांचा अर्थ समजून घ्या.

* * *



# गाडगेबाबा

**गो. नी. दांडेकर**

***********************************************************

**गोपाल नीलकंठ दांडेकर** (जन्मः १९१६)—प्रसिद्ध कादंबरीकार. 'माचीवरला बुधा', 'पडघवली', 'कुणा एकाची भ्रमणगाथा' इत्यादी अनेक कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या आहेत. तसेच गाडगेबाबांचे चरित्रही त्यांनी लिहिले आहे. त्यांचे 'स्मरणगाथा' हे आत्मचरित्र विशेष मान्यता पावले आहे.

गाडगेबाबा एक थोर सत्पुरुष होते. आपल्या कीर्तनातून ते लोकांना उपदेश करत, कष्टाचे महत्त्व शिकवत. लोकांच्या मनांतला देवभोळेपणा, अडाणी समजुती काढून टाकण्यासाठी झटत. गाडगेबाबांविषयीचा एक प्रसंग 'मृण्मयी' या कादंबरीतून येथे घेतला आहे.

..........................................................................

उन्हाळ्याची सगळी अंगणात झोपत. अंगण झाडून-सारवून स्वच्छ ठेवलेले.

खाली मोठे तरट. त्यावर तिघांची अंथरुणे. एका बाजूला तात्या. मधे मनू. पलीकडे सरस्वती.

त्या रात्री ती तिथे नेहमीप्रमाणे उशाजवळचा कंदील बारीक करून झोपी गेली. पहिली झोप झाली असेल नसेल. मनू पटदिशी जागी झाली. ती डोळे उघडून टकाटका बघू लागली. जे दिसले, त्याने थक्कित होऊन लगेच उठून बसली.

निंबोऱ्याखाली चांदण्यात बाबा उभे होते. त्यांच्या मागे त्यांचा शिष्यही होता.

शिष्य तात्यांना हाक मारायला पुढे सरत होता. बाबा त्याला थोपवत म्हणत होते, "आसू द्या जी. झोप लागली त्याहिले."

विजेच्या गतीने मनू उभी राहिली. खाली वाकून तिने तात्यांना हालवत म्हटले, "तात्या तात्या, बाबा आले. ते काय.. निंबोऱ्याखाली!"

मग ती धावत पुढे होऊन बाबांपाशी पोचली. त्यांचा हात धरून आनंदाने थरथरत म्हणाली, "आलात तुम्ही बाबा!"

तोवर तात्या अन् सरस्वती उठली होती. तात्यांनी कंदील मोठा केला अन् पुढे होऊन नमस्कार करत ते म्हणाले,"या ना बाबा."

बाबा मनूच्या डोक्यावर हात ठेवत म्हणाले, "सुखी मानसं आहा जी तुम्ही. इतक्या लवकर झोप लागते तुम्हांले? गरीब मानसं पाहा बरं. अन्नासाठी दारोदार असे भटकत राहतात —उपाशीतापाशी!"

मनू बाबांच्या तोंडाकडे पाहत होती. तिने चमकून पुसले, "जेवण व्हायचंय अजून तुमचं?"

"मंग! त्वा जेवायले नव्हतं बोलावलं?"

तत्क्षणी तात्यांनी सरस्वतीकडे पाहिले. उमगून ती माघारी वळून स्वयंपाकघराकडे गेली.

मनू म्हणाली, "या ना बाबा घरात."

पाऊलभर पुढे सरत बाबांनी म्हटले, "आइकलं का मनूची माय, बाहेर या पाहू. हां, सांगा की शिळंपाकं काय आहे घरात?"

सरस्वतीने दारातूनच म्हटले, "शिळंपाकं काही नाही बाबा. पण तुम्ही बिसावताहात तोवर मी जेवायला वाढते तुम्हांला."

कपाळाला हात लावत बाबा म्हणाले, "एका घरचं चारी ठाव जेवन नाही लिहिलं जी इथं! गोडच लागत नाही. पोट भरत नाही. तुम्ही आइका आमचं. काय कराल? भाकरी टाका. थे आडकूजी कोठीसा राहतात?"

तात्या बोलले, "या इथं—संत्र्याच्या बागेपलीकडं."

बाबांनी शिष्याकडे वळून म्हटले, "जा जी. काही शिळंपाकं भाजी-आमटी राहिलं अशीन. मग मागून आन जा. कल्ला फाडू नका. नाई तर अवघ्या गावाले सांगाल का गाडगेबाबा आले. आन मंग जेवन राहून जाईल जाग्यावर."

शिष्य तिकडे गेल्यावर बाबा पुढे सरून अंगणात खाली बसले. तात्यांनी घोंगडे आणून म्हटले, "यावर बसा ना बाबा."

त्यांच्या हातून ते घेऊन आपल्या मांडीखाली घालत बाबांनी म्हटले, "बसा अशी आम्हांपाशी. आमची मीरा कोठीसा गेली?"

मनू आईकडे गेली होती. ती बाहेर येत म्हणाली, ''आल्ये बाबा.''

''यो ना वो. आम्हांले घरी बलावलं अन् आपन तर इकडंतिकडं करून राह्यली. हां, सांगा जी मनूचे वडील, तुम्ही वऱ्हाडचे दिसत नाही.''

तात्या बोलले, ''मी कोकणातला.''

प्रसन्न होऊन बाबांनी म्हटले, ''तालुका कोन जी?''

''दापोली तालुका. गाव एका खाडीकाठी आहे.''



एकदम बाबा स्तब्ध झाले. काही क्षणांनंतर उसासून म्हणाले, ''हां, कसा साजरा देश

आहे जी कोकन! अवघा देश भटकलो, पन कोकनासारखा मुलूख नाही पाहिला जी कोठीसा! कशे माड, कशे सुपारीचे बाग, कशा आमराया, फनस, काजू, कोकमी—असं वाटतं, का देवाची बाग आहे कोकन!''

बाबांच्या एका बाजूला तात्या अन् दुसरीकडे मनू, अशी दोघे भान हरपून त्यांच्याकडे पाहत बसली होती.

बाबा बोलत राहिले, ''आपुन म्हनतो का देव कृपाळू आहे, आपुन त्याले नवस केला तर थो धावत येतो. पन आपल्या ध्यानी येत नाही, का केवढी प्रचंड हे सृष्टी! ग्रह कशे, नक्षत्र कशे, तारे कशे, चंद्र अन् सूर्य कशे! हे एवढं सगळं ज्यानं निर्मान केलं, तो साहेबाचा पट्टेवाला आहे का जी? का वावरातली उलीशिक भाजी दिली, तर धावू-धावू आपलं काम करून टाकील? अरे थो साहेबाचा साहेब आहे! ज्ञानोबानं सांगितलं, का आपापलं काम नेकीनं करत जावं, थो प्रसन्न होतो!''

''आइकलं का मीरा बेटी? देवाची हे सृष्टी, इच्यावर प्रेम करावं. सुख भेटलं, उतूमातू नोय. दुख कोसयलं अंगावर, तर चेपून-चिरडून जाऊ नोय. त्याचं स्मरन करावं अन् मंग मस्त जगावं.''

तो शिष्य अन् आडकूजी अंगणात येऊन पोचले. आडकूजीने हातातले भांडे एका अंगाला ठेवत बाबांना साष्टांग नमस्कार घातला. बाबांनी पुसले, ''काय आनलं जी?''

''वरन आनलं जी बाबा.''

''घरात पुसून आनलं? का आले भांडं उचलून तशेच?''

''नाई जी बाबा, घरातून तर दिलं!''

सरस्वतीने गरम गरम भाकरी आणल्या. बाबांनी आपल्या हातावरच त्या घेतल्या. खापरात वरण. जेवण झाल्यावर तेच खापर विसळून त्यात पाणी घेऊन पिऊन टाकले. निंबोऱ्यापाशी हात धुतले.

जेवण झाले आणि बाबा एकदम उठले. तात्यांनी आश्चर्याने म्हटले, ''निघाले बाबा?''

''हो जी. जावं लागते. तुमी बसा.''

काकुळत्या मुद्रेने मनू त्यांच्याजवळ येऊन उभी राहिली. तिच्या पाठीवर हात फिरवत बाबा म्हणाले, ''आता पुन्ना गाठ पड्याची तिथी मले मालूम नाई बेटी! देवाले काई मागू नोका. त्याच्यापुढं हात पसरून आपुनही लहान होऊ नोका, त्यालेही लहान करू नोका.''

बाबा जसे एकदम आले होते तसेच चपळाईने भराभरा चालू लागले. तात्या आणि आडकूजी 'कंदील घेऊन फाटकापर्यंत येतो' म्हणाले. त्यांना बाबांनी निकराने 'नाही' म्हटले. बघता बघता झाडांच्या आड ते दिसेनासे झाले.

शब्दार्थ व टिपा :

**थक्कित होऊन**—आश्चर्यचकित होऊन. **निंबोरा**—कडुनिंबाचे झाड. **चारी ठाव जेवण**—पानाच्या चारी बाजूंनी पदार्थ वाढले आहेत असे जेवण; पुष्कळ पदार्थ असलेले जेवण. **कोकमी**—कोकंबी– अमसुलाचे झाड. **उलीशिक**—थोडीशी. **उतूमातू नोय**—गर्वाने फुगू नये. **निकरानं**—निश्चयाने.

**टकाटका बघणे**—एकसारखे लक्ष लावून बघणे. **कल्ला फाडणे**—गलबला, गोंगाट करणे. **भान हरपणे**—जाणीव नाहीशी होणे.

**मनू (मनोरमा)**—'मृण्मयी' या कादंबरीतील तात्यांची मुलगी.हिला संतवाङ्मयाची आवड होती. मीराबाईंची अनेक भजने तिला पाठ होती. गाडगेबाबांशी आधी झालेल्या भेटीत तिने तुकारामांचा एक अभंग म्हणून दाखवला होता. बाबा तिला प्रेमाने 'मीरा', 'मुक्ताई' म्हणत.

प्रश्न व स्वाध्याय :

१. 'सुखी मानसं आहा जी तुम्ही,' असे गाडगेबाबा कोणाला म्हणाले? का?
२. बाबांना कशा प्रकारचे जेवण गोड लागत नसे?
३. 'कल्ला फाडू नका' असे ते का म्हणाले?
४. गाडगेबाबांची राहणी अगदी साधी होती हे कशावरून कळून येते?
५. देवापुढे हात पसरू नये असे बाबांना का वाटे?
६. या पाठात गाडगेबाबा वऱ्हाडी बोलीत बोलतात. त्या बोलीतली त्यांची काही वाक्ये निवडून आपल्या शिक्षकांच्या मदतीने वऱ्हाडी ढंगात बोलून दाखवा व त्या बोलीचा आनंद लुटा.

***




# दिला शब्द मोडू नये

**ग. दि. माडगूळकर**

************************************************************

**गजानन दिगंबर माडगूळकर** (जन्म:१९१९ ; मृत्यू:१९७७)—कवी, कथालेखक, पटकथालेखक, कादंबरीकार. 'जोगिया' हा कवितासंग्रह. 'चैत्रबन' हा चित्रपटगीतांचा संग्रह. 'लपलेला ओघ', 'बांधावरच्या बाभळी' इत्यादी कथासंग्रह. 'मिनी' ही मुलांसाठी लिहिलेली कादंबरी आणि 'नाच रे मोरा' हा बालगीतसंग्रह. एकोणीसशे सत्तावन्न साली त्यांना नाट्यसंगीत अकादमीचे पारितोषिक मिळाले.

पुढील उतारा 'शशांक-मंजिरी' या संगीतिकेतून घेतला आहे. मंजिरी ही उत्तर भारतातील वीरसेन राजाची लाडकी कन्या. तिने कुणाला शब्द दिला आणि पुढे तो पाळण्याची वेळ आल्यावर कोणते नाट्य निर्माण झाले व ते कसे प्रभावीरीत्या मांडले गेले,ते पहा.

शाहीर: वीरसेन राजा एक नांदे उत्तर भारती
मंजिरी कन्या लाडकी त्याची गुणवती
सोळा वर्षं वयाला झाली, त्यात रूपवती
चांदाचा तिचा मुखवटा, गव्हापरी कांती
तळहातावरिल अति नाजुक फोडापरी
राजानं वाढवली होती कन्या मंजिरी
देशोदेशीची खेळणी आणि बाहुल्या
राजानं होत्या तिजसाठी किती आणवल्या.



एकुलत्या एक लाडक्या लेकीसाठी
वाड्याच्या आतमधे होती शाही बाग मोठी
ठायी ठायी लतामंडप, तरूंची दाटी
जागोजाग बांधले पार तरुतळवटी
बागेमधे डोंगरटेकड्या होत्या जागोजाग
कृत्रिम केली तळी, वाहते ओघ
हुबेहूब होता उठला जंगलाचा भाग
जागोजाग हिरविगार राने, वाकडे माग
अशा एका मागावरून हिंडता-फिरता
ओढ्याच्या काठी आली राजाची सुता
रत्नखचित चेंडू एक तिच्या हातामधि होता
चेंडूशी लागली खेळु सहज नाचता

मंजिरी: उड रे चेंडू एक दोन तीन
ओली हिरवी छान जमीन
बैस फुलांवर गवताच्या
ये कमळावर हाताच्या
घेइ उशी, मी अशी धरीन
शिव अंब्याची उंच डहाळी
उंच उशी घे वर आभाळी
वाकुन उलटी तुला बघीन
म्हणतिल सारे पक्षी तुला रे,
कुठून येइ हे गोल गोजिरे!
फूलपाखरू आज नवीन?

शाहीर: मंजिरी होती अशी गुंग नाचगाण्यात
चेंडू दंग तिला हुलकावण्या देण्यात
दोघेहि रंगली होती अशा खेळात
एकाएकी अन् पडे चेंडु पाण्यात

लहरीसंगे पुढे चेंडु धावु लागे
मंजिरी तो धरण्याला धावू लागे मागे
पाण्याचा वेग काय येतो प्राण्याला?
धारेसंगे धावता चेंडु नाही गावला
निळ्या साडिचा खोचुन ओचा
पोर निघे ती सोशित ठेचा
चेंडु हाताला लागे कसचा?
कुठे मागमुस नाही त्याचा!
चेंडू गेला दूरवर वाहुन
मंजिरी बसे निराश होऊन
हातांच्या ओंजळीत टेकून हनुवटी
बसली मंजिरी एका तरुतळवटी
विचारांनी गराडा घातला तिला
राजा गेलेला दूर शिकारीला
तो जर का एवढ्यात माघारी आला
चेंडू गेला हे कसे बरे सांगावे त्याला?
चेंडू रत्नांनी सुंदर नटलेला
चटका लागला तिच्या जीवाला
आसवांच्या धारा डोळ्यांवाटे झरू लागल्या
गळा दाटला नाकपुड्या लाललाल झाल्या
तोच कुठुनिया आवाज कानी आला
दचकुन बघते वळुनी
दिसले नाही कुणी
पण शब्द येती कानी
आवाज: राजाच्या लेकी रडू नको
मनातल्या मनात अशि कुढू नको

मंजिरी : कोण ते बोलतंय!
गवतच हलतंय!
पुढं ये, पुढं ये, असा दडू नको

आवाज : काय झालं बोल
मन जरा खोल
नको ग अशी चिडू नको
राजाच्या लेकी तू रडू नको

मंजिरी : काय सांगू तुला ... चेंडू गेला सुटून
आवरता आवरेना रडू येतं फुटून
काय सांगू तातांना?
प्रश्न आता पडला ना!



आवाज : हात्तेच्या एवढंच ना
चेंडू आणून देतो ना !

मंजिरी : देतो ना! कोण, कोण
कोण, आहेस असा?

ससा : (बाहेर येत) मी ना, मी आहे ससा!

मंजिरी : ससा? ससा?
तू रे चेंडू आणशिल कसा?
कसा? कसा?

ससा : कसा? कसा?
पाण्यामागे धावीन
त्याची पाठ शिवीन
जमिनीत गेला तर नखानं खणून
तुला तुझा चेंडू देईन आणून!

मंजिरी : दे बाबा, दे
माझा दुवा घे!

ससा : माझी आहे अट

मंजिरी : बोल झटपट!

ससा : तुझ्या संगतीत खेळायचं आहे
राजाच्या पंगतीत बसायचं आहे
जेवीन तुझ्या बशीत
झोपीन तुझ्या कुशीत
आहे का कबूल? बोल बोल बोल
असेल कबूल तर आणतो चेंडू
नंतर नको हं माझ्याशी भांडू!
(मंजिरी गप्प होते)
राजाच्या लेकी बोलत का नाहीस?
प्रश्नाला उत्तर देत का नाहीस?

शाहीर: राजाच्या लेकीनं विचार केला —
दुर्मिळ असते पंगत राजाची भल्याभल्याला
लाभावी कशी ती या बिचाऱ्या सशाला
होकार कशी देउ संगत करण्याला?
राजाघरीं होइल कसा हा पाहुणा?
जाणुनबुजून कसा करावा हा खुळेपणा?
कापूस पिंजला पांढरा सावरिचा जसा
किति गोजिरवाणा गोड दिसे तो ससा!
डोळ्यांतली माणकं गोल गोल लाल
टवकारले उंच कान, गोबरे गोबरे गाल
कोवळी लुसलुशीत हरळी लुबुलुबू खाई
टुणुटुणु मारतो उड्या मागल्या दोन पायी
असा ससा राजकन्येच्या समोरी बसे
कळवळुन तिला बिचारीला सारखा पुसे—
राजाच्या लेकी बोलत का नाहीस?
प्रश्नाला उत्तर देत का नाहीस?
पुन्हा मंजिरीनं विचार मनामधि केला
कामापुरता होकार टाकावा देउन याला!
मी तर राजाची लेक, ससा हा असा रानातला
पुन्हा कशाला येतो अन् जातो राजवाड्याला!

ससा: राजाच्या लेकी, आहे का कबूल? बोल बोल बोल

मंजिरी: आहे कबूल रे, आहे कबूल—त्रिवार सांगते आहे कबूल!

शाहीर: दिलं वचन तिनं खोटं सशाला
बिचारा धावला चेंडू शोधायला
तुरुतुरुतुरु दौडत जाऊन

आला माघारी चेंडू घेऊन
रत्नखचित चेंडू आला परतून
मंजिरी गेली मनी हरखून
मोद अति झाला मनाला
पार विसरून गेली सशाला
बघता बघता तिने प्रासाद गाठला
ससा बिचारा बघतच राहिला—
सजला वाडा झाला सुशोभित
चंदनी उदबत्त्यांचा चहूकडे घमघमाट
छती हंड्या झुंबरांचा झळकता झगमगाट
राजा वीरसेनाची बसली खाशी पंगत
बापाजवळ बसली मंजिरी मोठ्या थाटात
पाची पक्वान्नं वाढली चांदीच्या ताटांत
तोच, कानी आली कुणाची तरी चाहूल
बघतात, तर थेट सशाचे दारात पाऊल!
सरदार, दरकदार गेले चकित होऊन
काय करावे कळेना, सशाला असे बघून
राजाच्या पंक्तीला न बोलावता हा असा आला
काय म्हणावे या आगंतुक पाहुण्याला!
प्रश्न पडला—आता राजा काय म्हणेल आपल्याला
गडबड गोंधळ ऐकून राजा संतापला
म्हणे—आणा मजपुढे असेल जो त्याला
धावले नोकर, ससा धरून आणिला
बघताच समोर त्याला बसला धक्का मंजिरीला
"काय हवं या मुक्या प्राण्याला?" राजा बोलला
नोकराआधी ससा पुढे होऊन म्हणाला—



"तुमच्या मुलीनं शब्द आहे मला दिला
वचनाचा का भंग शोभे राजवंशाला?"

राजा : होय ग मंजिरी? गोष्ट आहे खरी?
सशाला वचन कशासाठी?
आला कसा तो तुझ्यापाठी?

मंजिरी : गेलेला चेंडू त्यानं आणून दिला
तेव्हा त्याला मी शब्द होता दिला.

राजा : अस्सं! खरं ना हे?
धरली संगत सोडू नये
दिला शब्द मोडू नये
त्याला आता राहू दे
माझ्यासंगे जेवू दे!

ससा : जेवणार आहे बशीत
झोपणार तिच्या कुशीत

राजा : ते काय म्हणून?

ससा : दिलं आहे वचन
म्हणून, म्हणून, म्हणून!
राजा : होय ग मंजिरी?
मंजिरी : गोष्ट आहे खरी...
राजा : आहे ना खरी, मग ऐक.
बोललं तसं वागलं पाहिजे,
दिल्या वचनाला जागलं पाहिजे,
राजाचा पाहुणा आला ससा
ताटात तुझ्या जेवू दे कसा.
सगळे : (मंजिरी सशाला जवळ घेते. सगळे मिळून म्हणतात)
बोललं तसं वागलं पाहिजे,
दिल्या वचनाला जागलं पाहिजे.

शब्दार्थ व टिपा :

**कांती**—तेज. **लतामंडप**—वेलीचा मांडव. **तरूतळवटी**—झाडांच्या बुडाशी. **माग**—रस्ता. **उशी घेणे**—उसळी मारणे; उडी घेणे. **हरखणे**—आनंदित होणे. **दुवा**—आशीर्वाद. **हुलकावणी**—भलतीकडे रोख दाखवून फसवणे. **मागमूस**—ठावठिकाणा.

प्रश्न व स्वाध्याय :

१. राजाचे मंजिरीवरचे प्रेम कोणकोणत्या गोष्टींतून दिसून येते?
२. मंजिरीचा चेंडू पाण्यात पडल्यानंतर तिच्या मदतीला कोण धावून आले?
३. मंजिरीने सशाला कोणते वचन दिले?
४. राजाने मंजिरीला काय उपदेश केला?
५. हुलकावण्या देणे, मागमूस नसणे, दिल्या वचनाला जागणे यांचा वाक्यांत उपयोग करा.
६. शिक्षकांच्या मदतीने ही संगीतिका बसवा व योग्य प्रसंगी सादर करा.
७. 'दिला शब्द मोडू नये' हे वचन वळणदार अक्षरांत लिहून ते आपल्या वर्गात लावा. अशी आणखी काही वचने माहीत करून घ्या व ती आपल्या वहीत लिहून ठेवा.

***

# ३०. छंद हेच जीवन

**यास्मिन शेख**

*****************************************************************

**यास्मिन अझीझ अहमद शेख** (जन्मः १९२५)—मराठीच्या प्राध्यापिका. मराठी साहित्याच्या चोखंदळ अभ्यासक. काही उत्तम ललितकृतींची समीक्षणे त्यांनी रसिकपणे केली आहेत. स्वतःला जाणवलेल्या सौंदर्याचा नेमक्या व अचूक शब्दांत इतरांना परिचय करून देणे हे त्यांचे वैशिष्ट्य.श्री. केळकर यांची खास मुलाखत घेऊन हा लेख त्यांनी लिहिला आहे.

'राजा केळकर वस्तुसंग्रहालय' हे पुणे शहराचे एक वैभव आहे. जुन्या दुर्मिळ वस्तू जमवणे हा श्री. केळकर यांचा अनेक वर्षांचा छंद. त्यातून हे संग्रहालय उभे राहिले आहे. एकटा माणूस आपल्या चिकाटीने व परिश्रमाने केवढे मोठे कार्य करू शकतो याचा हा एक आदर्श नमुना आहे.

.................................................................

माणसाला कसला तरी छंद हवा. कुणी पोस्टाची तिकिटे गोळा करतो, कुणी चित्रे जमवतो, तर कुणी रंगीबेरंगी दगडगोटेच. कुणाजवळ जुन्या नाण्यांचा संग्रह असतो, तर कुणापाशी शंखशिंपल्यांचा. असा छंद कशासाठी जोपासायचा? आनंदासाठी!

आपल्या आवडत्या वस्तू गोळा करताना आपण प्रसंगी तहानभूकही विसरतो; पण पुष्कळदा लहानपणी जडलेले छंद पुढे विरून जातात, तर कधी एका छंदाची जागा दुसरा छंद घेतो. केव्हा केव्हा तर असा छंद माणसाचे सारे आयुष्य व्यापून टाकतो. एखादा छंदवेडा माणूस अशा छंदासाठी आपली सर्व शक्ती, संपत्ती आणि सर्वस्व वेचतो.

अशाच एका छंदातून उभे राहिले आहे 'राजा केळकर वस्तुसंग्रहालय'. कधी पुण्याला गेलात तर हे संग्रहालय तुम्ही अवश्य पाहा. तिथे विविध प्रकारच्या प्राचीन व ऐतिहासिक वस्तू आहेत. त्या पाहताना काय पाहू आणि काय नको असे तुम्हांला होऊन जाईल!

'कमलकुंज' नावाच्या ज्या वाड्यात हा संग्रह आहे, तो दिसतो एखादया पेशवेकालीन महालासारखा. भारतात एके काळी नित्य वापरात असलेल्या

कलापूर्ण वस्तूंचा मूल्यवान ठेवा तिथे आहे. धातूंचे निरनिराळ्या आकारांचे नक्षीदार दिवे आणि दीपमाळा पाहिल्या, की मन थक्क होते. सुंदर अस्सल कलाकुसरीचे शिसवी लाकडाचे दरवाजे, सुंदर सुंदर खांब आणि वेगवेगळ्या आकारांची तुळशीवृंदावने पाहू लागलो, की डोळे दिपून जातात! या संग्रहालयातल्या चित्ताकर्षक मूर्ती म्हणजे तर भारतीय शिल्पकलेचे अप्रतिम नमुनेच आहेत. भारतीय वाद्यांचे तर इथे भांडारच उघडले आहे. तऱ्हेतऱ्हेच्या दौती, वऱ्या, पत्ते, सोंगट्या, सप्तसूर प्रकट करणाऱ्या घंटा, भरतकामाचे विविध प्रकार अशा कितीतरी वस्तूंचे तिथे जणू प्रदर्शनच भरले आहे. इथले वेगवेगळ्या आकारांचे व नक्षीचे अडकित्ते तर बघताक्षणी मन वेधून घेतात!

मस्तानीचा महाल तर कोथरूडवरून निखळून आणून तो केळकरांनी जसाच्या तसा पुन्हा इथे उभा केला आहे. हा महाल आपल्याला ऐतिहासिक काळात घेऊन जातो. याशिवाय आणखी कितीतरी सुंदर कलाकृती इथे आहेत. विविध रंगांनी लखलखणारी झुंबरे आहेत. असंख्य ज्योतींनी झगमगणारे दीप



आहेत. त्यांमध्ये वरून तेल घातले,की लक्ष्मीच्या हातांतल्या दिव्याची तेवणारी वात आपल्याला विस्मित करते. तसाच तो सूर्यदिवा. बघताक्षणी डोळे दिपतात! एकीकडे पांगुळगाड्यावरचा रांगता गोजिरा बाळकृष्ण आपल्याला खुणावतो, तर दुसरीकडे काचेच्या कपाटातली १३ व्या शतकातली धनुर्धारी रामाची सुबक मूर्ती आपली नजर ओढून घेते. अशा किती म्हणून वस्तू सांगाव्या!

हे प्रचंड वस्तुसंग्रहालय उभे राहिले आहे केवळ एका व्यक्तीच्या हिमतीवर! त्या व्यक्तीचे नाव—दिनकर गंगाधर केळकर. साठपासष्ट वर्षे अविश्रांत परिश्रम करून या वस्तुसंग्रहालयाच्या रूपाने त्यांनी एक अद्‌भुत सृष्टीच निर्माण केली आहे.

केळकर हे मूळचे कवी. 'अज्ञातवासी' या टोपणनावाने ते ऐतिहासिक विषयांवर कविता लिहीत असत. या कवितांच्या निमित्ताने त्यांनी अनेक ऐतिहासिक स्थळांना भेटी दिल्या. नकळत प्राचीन दुर्मिळ वस्तूंकडे त्यांचे लक्ष वेधू लागले. आपल्या राहत्या वाड्यात ऐतिहासिक वातावरण निर्माण व्हावे या विचाराने ते प्राचीन कलात्मक वस्तू जमवू लागले. कविता करण्याच्या छंदातून हा एक दुसराच छंद जन्माला आला. या दुसऱ्या छंदाने पहिल्या छंदावर मात केली आणि त्यानेच त्यांचे संपूर्ण आयुष्य व्यापून टाकले.

आरंभी केळकरांचे पुण्यात चष्म्याचे दुकान होते; पण हे वस्तू जमवण्याचे वेड पुरवायचे तर खूप पैसा लागे. एखाद्या दुर्मिळ वस्तूचा सुगावा लागला, की वाटेल त्या गावी, प्रसंगी पायपीटही करून जायची त्यांची तयारी असे. त्यासाठी त्यांना कधी कर्ज काढावे लागे, कधी वस्तू मिळवण्यासाठी मालकांच्या विनवण्या कराव्या लागत, तर कधी अपमानही वाट्याला येई. अशा कितीही अडचणी आल्या,तरी वस्तू गोळा करण्याचा आपला छंद केळकरांनी कधी सोडला नाही. या मुलखावेगळ्या छंदामुळे त्यांचे आपल्या संसाराकडे, चालत्या दुकानाकडे दुर्लक्ष होऊ लागले. अखेर त्यांनी आपले दुकान बंद केले; पण आपला छंद सोडला नाही! या छंदापायी त्यांना आपले घरसुद्‌धा दोनदा गहाण टाकावे लागले.

केळकरांचा एकुलता एक मुलगा 'राजा' याच काळात त्यांना सोडून गेला! त्यांना अतीव दुःख झाले. मुलाची आठवण म्हणून त्याच्या नावे एक भव्य वस्तुसंग्रहालय उभारावे असे त्यांच्या मनाने घेतले. याच एका कामासाठी त्यांनी आपले उभे आयुष्य वेचले. या साऱ्या धडपडीतून जे स्मारक त्यांनी उभे केले, तेच हे, 'राजा केळकर वस्तुसंग्रहालय!'

या संग्रहालयाच्या उभारणीमागे जसे केळकरांचे परिश्रम आहेत, तसे त्यांच्या पत्नी कमलाबाई यांचीही साथ आहे. दुर्मिळ वस्तू खरेदी करताना पुरेसे पैसे नसले तर केळकरांना कमलाबाईंचे दागिने गहाण टाकावे लागत. प्रसंगी ते मोडावेही लागत; पण कमलाबाईंनी हे सारे आनंदाने केले.

एकदा तर परीक्षा पाहणारा एक मोठा बाका प्रसंग केळकरांवर आला. भारतामध्ये एकट्याच्या बळावर उभी राहिलेली अशी दोन वस्तुसंग्रहालये आहेत. एक हैद्राबादचे सालारजंग यांचे व दुसरे पुण्यातले केळकरांचे. केळकरांच्या संग्रहालयाची ख्याती ऐकून सालारजंग ते पाहायला मुद्दाम पुण्याला आले. केळकरांच्या संग्रहालयाला त्यांनी भेट दिली. प्राचीन वस्तूंचा तो अमोल संग्रह पाहून ते दिपून गेले. सालारजंगही केळकरांसारखेच छंदवेडे! केळकरांचा संग्रह विकत घ्यावा व आपल्या संग्रहालयात त्याची भर घालावी, असा विचार साहजिकच त्यांच्या मनात आला. त्यासाठी वाटेल ती किंमत मोजावी लागली तरी माघार घ्यायची नाही, असा निश्चय करून त्यांनी केळकरांपुढे कोरा चेक ठेवला. ते म्हणाले, "तुम्हांला हवा तो आकडा या चेकवर लिहा आणि तुमचं हे संग्रहालय मला द्या."

एका क्षणात कोट्यधीश होण्याची केवढी मोठी संधी केळकरांकडे चालून आली होती; पण त्यांचे चित्त जराही विचलित झाले नाही. इतक्या ममतेने जिवापाड जोपासलेल्या आपल्या वस्तुसंग्रहालयाचे मोल पैशात कसे होणार? त्यांच्या मनाला हे मुळीच पटले नाही. स्पष्ट शब्दांत ते म्हणाले, "नबाबसाहेब, मी हे संग्रहालय जमवलं ते विकण्यासाठी नाही, आपण मला क्षमा करा."

सालारजंगांनी केळकरांची भावना ओळखली. त्यांनीही आग्रह धरला नाही.

सत्तरीकडे झुकल्यावर मात्र आपल्या या संग्रहालयाची नीट देखभाल पुढे कशी होणार ही चिंता केळकरांना लागली. एकूण सर्व विचार करून त्यांनी ते महाराष्ट्र सरकारकडे सुपूर्त केले.

आता नव्वदीच्या घरातले केळकर निवृत्त होऊन जुन्या आठवणी काढत निवांतपणे बसलेले असतील,अशी कुणाचीही कल्पना होईल. पण तसे नाही. उलट एक नवे स्वप्न त्यांच्या डोळ्यांसमोर आता तरळत आहे. आपल्या दिवंगत पत्नीच्या स्मरणार्थ एक आगळे वस्तुसंग्रहालय उभारावे,असे त्यांच्या मनाने घेतले असून तिथे भारतीय स्त्रियांच्या जीवनाशी निगडित अशा वस्तूंचा संचय केला जात आहे. वयोवृद्ध केळकर तरुणाच्या उत्साहाने या कामाला भिडले आहेत.

शब्दार्थ व टिपा :

**वज्री**—अंग घासायचा दगड. **धनुर्धारी**—धनुष्य धारण केलेला. **दुर्मिळ**—मिळण्यास कठीण. **गहाण**—कर्जाऊ घेतलेल्या रकमेच्या पोटी हमी म्हणून ठेवायची वस्तू वा जिन्नस. **ख्याती**—प्रसिद्धी, कीर्ती. **सुगावा**—ठावठिकाणा. **मात करणे**—विजय मिळवणे. **पायपीट करणे**—खूप फिरणे. **तहानभूक विसरणे**—तन्मय होणे.

**मस्तानी**—एक अत्यंत लावण्यवती मुस्लिम स्त्री. पहिले बाजीराव पेशवे यांची ती अतिशय आवडती होती. **चेक**—धनादेश—आपल्या खात्यातून विशिष्ट रक्कम काढण्यासाठी खातेदाराने बँकेकडे दिलेला आपल्या सहीचा आदेश.

प्रश्न व स्वाध्याय :

१. माणसाला कोणकोणते छंद असतात?
२. 'राजा केळकर वस्तुसंग्रहालया'त कोणकोणत्या प्रकारचे दिवे आहेत?
३. हे वस्तुसंग्रहालय उभे करण्यासाठी केळकरांनी कोणकोणते प्रयत्न केले?
४. केळकरांच्या पत्नीने संग्रहालयाच्या उभारणीसाठी काय केले?
५. सालारजंग यांची मागणी केळकरांनी का नाकारली?
६. आपल्यालाही असा एखादा छंद असावा असे तुम्हांला वाटते का? त्यासाठी तुम्ही कोणते प्रयत्न कराल?

***

# ३१ संतवाणी

************************************************************

ज्ञानदेव, मुक्ताबाई, नामदेव, जनाबाई, चोखामेळा, एकनाथ, तुकाराम अशा अनेक संतांनी मराठी भाषेत फार गोड अभंग लिहून ठेवलेले आहेत. संतांची अभंगवाणी हा आपला मोठाच ठेवा आहे. या अभंगांतून ज्ञानाची, भक्तीची व सदाचरणाची शिकवण पिढ्यान्‌पिढ्या आपल्याला लाभली आहे.

संतांचे काही अभंग इथे घेतलेले आहेत.

(१)

आंधळ्याची काठी । आडकली कवणें बेटीं ॥
माझिये हरणी । गुंतलीस कोणे रानीं ॥
मुकें मी पाडस । चुकलें भोवें पाहें वास ॥
तुजवीण काय करूं । प्राण किती कंठीं धरूं ॥
आतां जीव जाऊं पाहे । धांव घालीं माझे आये ॥
माझी भेटवा जननी । संतां विनवी दासी जनी ॥

**जनाबाई**

(२)

नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥१॥
तैसें चित्त शुद्‌ध नाहीं । तेथे बोध करील काई ॥२॥
वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करील वसंतकाळ ॥३॥
प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ॥४॥
तुका म्हणे जीवनेंविण । पीक नव्हे, नव्हे जाण ॥५॥

**तुकाराम**

(३)

चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगीं साकर अवघी गोड ॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळेचिना ॥

**तुकाराम**



## शब्दार्थ व टिपा :

**भोवें**—फिरते. **जननी**—आई. **वेव्हार**—व्यवहार; हालचाल.

## प्रश्न व स्वाध्याय :

१. 'आंधळ्याची काठी' असे कुणाला उद्देशून म्हटले आहे? का?
२. 'माझी भेटवा जननी' अशी विनंती जनाबाई का करतात?
३. तुकाराम चित्तशुद्धीचे महत्त्व का सांगतात?
४. सज्जनाचे कोणते गुण तुकारामांनी सांगितले आहेत?
५. 'नाहीं निर्मळ जीवन काय करील साबण?' या ओळीत जो प्रश्न विचारला आहे त्यातच साबण काही करू शकणार नाही असे उत्तर आहे. या प्रकारची आणखी काही उदाहरणे या पाठातून शोधा.

***

## ३२ विचारधन

## १. आपण खत होऊ या

नामदार गोपाळ कृष्ण गोखले



**गोपाळ कृष्ण गोखले**—हे लोकमान्य टिळकांचे समकालीन. उदारमतवादी म्हणून ते प्रसिद्ध होते. विधायक कार्य करणाऱ्या अनेक संस्थांना त्यांनी चालना दिली. त्यांनी 'सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी' नावाची संस्था स्थापन केली. 'भारत सेवक समाज' या नावाने आता ती परिचित आहे. महात्मा गांधी गोपाळ कृष्ण गोखले यांना गुरुस्थानी मानत.

आज सर्वांत अधिक गरज असेल तर ती देशाच्या चारी कोपऱ्यांत ऐक्याची नि देशभक्तीची शिकवण देणाऱ्या कार्यकर्त्यांची. देशप्रेम इतके पराकोटीला पोचायला हवे, की केवढाही त्याग करायला लागो तो आनंददायी वाटला पाहिजे. आज त्यागाची अधिक जरूर आहे. बोलणे नको; काम हवे!

आपण सारे भाऊ भाऊ आहोत. आपण सारे हिंदी आहोत. धर्म आणि पंथ यांत गुरफटून जाऊ नका. समाजाची सर्वांगीण उन्नती होण्यासाठी राष्ट्रीय चारित्र्यही हवे. आज नैतिक सामर्थ्य कमी होत आहे. संकुचित भावना आणि क्षुद्र विचार यांची मगरमिठी न सोडवू तर भाग्योदय कसा होणार? आपल्या सर्व कामांत शिस्त, स्वार्थत्याग व कुशलता हे गुण प्रामुख्याने हवेत. राष्ट्राची उभारणी हे सोपे काम नाही.त्यासाठी सबंध आयुष्य द्यावे लागते. आपण खत होऊ या, भावी पिढी पीक घेईल.

## २. राष्ट्राचे भावी आधारस्तंभ

**महर्षी धोंडो केशव कर्वे**

**धोंडो केशव कर्वे**—हे 'महर्षी अण्णासाहेब कर्वे' म्हणून ओळखले जात. समाजसुधारणेच्या कामात ते हिरिरीने भाग घेत. हिंगणे स्त्रीशिक्षण संस्था, एस. एन. डी. टी. महिला विद्यापीठ या संस्था त्यांच्या प्रयत्नांनी नावारूपाला आल्या. त्यांनी केलेल्या समाजसेवेच्या गौरवार्थ आपल्या भारत सरकारने त्यांना 'भारतरत्न' हा किताब दिला.



विद्यार्थी व विद्यार्थिनी हे राष्ट्राचे भावी आधारस्तंभ आहेत. त्यांनी दोन गोष्टी सतत ध्यानी बाळगाव्या—(१) गतानुगतिक वृत्ती टाकून स्वतंत्र विचार करायला त्यांनी शिकावे. मात्र हे लक्षात ठेवले पाहिजे, की आपल्याला स्वतंत्र विचार करण्याचा जसा हक्क आहे तसाच तो इतरांनाही आहे. (२) मनाचा समतोलपणा राखावा.

केव्हाही मनाचा समतोल ढळता कामा नये. हा तोल सावरणे ही कठीण गोष्ट आहे. हा तोल सांभाळला नाही म्हणूनच जगात मोठमोठे अनर्थ घडून आलेले आहेत. मनाचा समतोल सांभाळून व भावनांच्या आहारी न जाता आपल्याला पटलेली गोष्ट धैर्याने आचरणात आणणारी माणसेच आपले हे स्वराज्य टिकवू शकतील.

समतेचे तत्त्व आचरणात आणणारी व भेदाभेद न मानणारी माणसे मोठ्या प्रमाणात झाल्याशिवाय या देशाचा उद्धार होणार नाही, अशी माझी ठाम खात्री आहे. समतेचे हे तत्त्व स्थापन करण्यासाठी महात्मा गांधींनी जन्मभर परिश्रम केले. तेच कार्य लोकांनी पुढे चालवले पाहिजे.

## ३. जाती-पोटजाती अराष्ट्रीय आहेत

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर**

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर**—हे भारतीय घटनेचे एक प्रमुख शिल्पकार गणले जातात. त्यांनी विपुल लेखन केले आहे. त्यांच्या लेखांचे, भाषणांचे अनेक संग्रह मराठीत व इंग्रजीत प्रसिद्ध झाले आहेत. पुढील विचारधनाचे संकलन त्यातून केले आहे.

अस्पृश्यतेमुळे अस्पृश्यांचेच नुकसान झाले आहे असे नसून, त्यांच्याबरोबर स्पृश्यांचे तसेच देशाचेही अपरिमित नुकसान झाले आहे. अस्पृश्यतेच्या कलंकाने केवळ अस्पृश्यच कलंकित झाले आहेत असे नव्हे, तर स्पृश्यही कलंकित झाले आहेत. ज्यास कमी मानण्यात येते त्यात त्यांचा अवमान तर होतोच, पण जे कमी मानतात त्यांची नीतीही खालावलेली असते.

अस्पृश्य लोक अस्पृश्यतेच्या गर्तेतून निघून त्यांचे आत्मस्वातंत्र्य त्यांस प्राप्त झाले तर ते केवळ आपली उन्नती करतील, इतकेच नव्हे तर आपल्या पराक्रमाने, बुद्धीने, उद्योगाने देशाच्या भरभराटीस कारणीभूत होतील. अशा दृष्टीने पाहिले तर अस्पृश्यता निवारण्याची चळवळ ही पतितोद्धाराची चळवळ नसून खऱ्या लोकसंग्रहाची चळवळ आहे.



हजारो जाती-पोटजातींत विभागलेले लोक एक राष्ट्र कसे बरें बनू शकतील? आपण अद्यापि राष्ट्र या पदवीला पोचलो नाही, ही गोष्ट आपण जितक्या लौकर ध्यानी घेऊ तितके चांगले. जाती, पोटजाती या अराष्ट्रीय समजल्या पाहिजेत, कारण सामाजिक बाबतींत आपल्यांत त्या फुटीरपणा निर्माण करतात. त्या एकमेकांत द्वेष, मत्सर आणि अनास्था पैदा करतात म्हणूनही त्या अराष्ट्रीयच होत.

***

